महाराष्ट्राचे

# शिल्पकार

# यदुनाथ थत्ते

RAJA BADSAL

मु. ब. शहा



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

38
A

# यदुनाथ थत्ते

## सव्यसाची पत्रकार व समाजसेवक

डॉ. मु. ब. शहा




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : मार्च २००४
महाराष्ट्राचे शिल्पकार : क्र. २१

प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई ४०० ०१४



मुद्रक :
प्रमोद भोगटे,
स्नेहेश प्रिंटर्स,
३२०-ए, शाह अँड नाहर इंड. इस्टेट अ-१,
धनराज मिल आवार, सीताराम जाधव मार्ग,
लोअर परळ, मुंबई-१३. (दूरध्वनी : २४९४ ५६१५)

मुखपृष्ठ : राजा बडसल

किंमत : रु. ४०/-



# निवेदन

महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, आर्थिक व वैचारिक जडणघडणीत ज्या दिवंगत महनीय व्यक्तींचा महत्त्वपूर्ण सहभाग आहे अशा व्यक्तींची साधारणत: शंभर ते सव्वाशे पानांची सुबोध मराठी भाषेत चरित्रे लिहून ती महाराष्ट्राचे शिल्पकार या योजनेअंतर्गत पुस्तकरुपाने प्रकाशित करण्याची मंडळाने योजना आखली असून या चरित्रग्रंथमालेतील यदुनाथ थत्ते हा एकविसावा चरित्रग्रंथ आहे.

डॉ. मु. ब. शहा यांनी या ग्रंथात यदुनाथ थत्ते यांच्या व्यक्तिमत्त्वाची नितांत सुंदर उकल केली आहे. यदुनाथ थत्ते यांच्या व्यक्तिमत्त्वाविषयी त्यांच्या मनात आदर, अपार जिव्हाळा असला तरी भाबडी भावुकता या लेखनात कुठेही जाणवत नाही. इतकेच नव्हे तर या लेखनात स्वत:चा कुठेही निर्देश न येऊ देण्याची दक्षता त्यांनी घेतलेली आहे.

अशा स्वरुपाचा चरित्रग्रंथ जेव्हा लिहिला जातो तेव्हा ग्रंथाच्या शेवटी संदर्भ ग्रंथांच्या नावांची यादी दिली जाते. या चरित्रग्रंथाच्या लेखनासाठी आपण किती संदर्भ ग्रंथांचा अभ्यास केलेला आहे हे दाखविण्यामागे जसा त्या लेखकाचा उद्देश असतो त्याप्रमाणे त्या ग्रंथाचे लेखन आपण कसे साधार केलेले आहे, हेही नमूद करण्याचा त्यामागे उद्देश असतो. डॉ. मु. ब. शहा यांनी तेही केलेले नाही. या चरित्रग्रंथाचे लेखन करताना तसे काही करण्याची त्यांना आवश्यकता भासली नसावी. यदुनाथजी त्यांना जसे जाणवले, यदुनाथजींना त्यांनी जसे अनुभवले तसे त्यांनी त्यांना शब्दबद्ध केले आहे. त्यामुळे एरवी अशा प्रकारच्या चरित्रग्रंथात अभावानेच आढळणारा जिव्हाळा, उत्कटता या चरित्रग्रंथात पुरेशा प्रमाणात

आलेली आहे. या चरित्रग्रंथात डॉ. मु. ब. शहा यांनी यदुनाथजींच्या व्यक्तिमत्त्वाचे घडविलेले दर्शन वाचकांना उदात्त, उत्कट अनुभव देणारे आहे.

हा ग्रंथ वाचत असताना एक गोष्ट माझ्या मनात आलेली आहे. तीही नमूद करणे मला आवश्यक वाटते. साधना साप्ताहिक व यदुनाथजी थत्ते यांचं नातं इतकं अतूट होतं की यदुनाथजींना वगळून साधनेचा विचार करता येत नाही. त्याप्रमाणेच साधनेला वगळून यदुनाथजींचा विचार संभवत नाही. डॉ. मु. ब. शहा यांनी या ग्रंथात साधनेचा खाली नमूद करण्यात आल्यानुसार सार्थ निर्देश केलेला आहे.

''महाराष्ट्रातल्या किमान तीन पिढ्या साधनेच्या विचारांवर पोसल्या गेल्या. राष्ट्रप्रेमाचे, समाजवादी विचारांचे, समाजसेवेचे, लोकांकरिता धडपड करण्याचे धडे या पिढ्यांनी साधनेकडून प्रेरणा घेऊन गिरविले. साधना आणि साधनाकार यदुनाथ थत्ते यांचे हे ऋण या पिढ्या कधीही विसरू शकणार नाहीत.''

''साधना महाराष्ट्राच्या वृत्तपत्रक्षेत्रांत स्वत:चाच एक मानदंड आहे. इतर अनेक वृत्तपत्रे काळानुरुप स्वत:ची ध्येयधोरणे व रंगरुप बदलत होती. पण यदुनाथजी असेपर्यंत साधनेच्या ध्येयधोरणात व रंगरुपातही कोठलाच बदल झाला नव्हता. आचार्य जावडेकरांनी प्रतिपादलेल्या निर्भर, निर्वैर, आणि नि:पक्ष यतिधर्माचे पालन साधना करीत आली.''

महाराष्ट्राच्या जडणघडणीचा विचार करताना आम्ही या जडणघडणीला कारणीभूत असलेल्या व्यक्तींना त्याचे श्रेय देतो. त्यांच्यावर आम्ही ग्रंथ लिहितो. त्याप्रमाणेच महाराष्ट्राच्या जडणघडणीस कारणीभूत असलेल्या संस्था, साधनेसारखी विचारपत्रे यांना त्याचे श्रेय का देऊ नये? त्यांच्यावर अशा प्रकारचे ग्रंथ का लिहू नयेत?

**रा. रं. बोराडे**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

मुंबई
दिनांक : ११-३-२००४

"हात हरकामी, बुद्धी सर्वगामी आणि हृदय
सर्वप्रेमी असावे म्हणून धडपडण्यात जीवनाची
कृतार्थता आहे."

# अनुक्रमणिका

# जन्म व शिक्षण

येवले हे नाशिक जिल्ह्यातले एक छोटेसे तालुक्याचे गाव आहे. या गावात नारायण गोविंद साठ्ये हे एक सेवाभावी डॉक्टर राहात. गावात त्यांच्या नावाचा फार दबदबा होता. अनेक सामाजिक, सांस्कृतिक संस्थांचे ते पाठीराखे होते. देश आणि समाज या दोघांविषयी डॉक्टरांची जाणीव फार जागृत होती. त्यामुळे त्या काळी स्वातंत्र्यासाठी सर्वसामान्य जनतेचे जे लहानमोठे लढे चालत त्याला त्यांचा पूर्ण पाठिंबा असे. सर्व जातिधर्मांच्या लोकांसाठी, अडल्या-नडलेल्यांसाठी त्यांच्या दवाखान्याची आणि घराची दारे सतत उघडी असत.

डॉक्टरांच्या चिरंजीवांनी त्यांचा वसा समर्थपणे चालवला. त्यांचे नाव जगन्नाथ होते. देशासाठी त्यांनी तुरुंगवास भोगला. १९३०-३२च्या स्वातंत्र्यलढ्यात त्यांचा सहभाग होता. त्यांना धुळ्याच्या तुरुंगात ठेवले होते. जगन्नाथही डॉक्टर होते. त्यांच्या सहवासाचा व शिकवणुकीचा यदुनाथांवर बराच परिणाम झाला होता. मूळ वाईचे राहणारे डॉ. साठ्ये शिक्षणासाठी पुण्यात आले. पुण्याच्या मेडिकल कॉलेजमधून त्यांनी M.B.B.S.ची डिग्री मिळवली व प्रॅक्टिस करण्यासाठी त्यांनी येवले हे गाव निवडले. हे डॉक्टर साठ्ये म्हणजे आपले चरित्र नायक यदुनाथजींचे आजोबा होत. आईचे वडील. यदुनाथांचा जन्म येवल्यालाच या आजोबांच्या घरी ५ ऑक्टोबर १९२२ रोजी झाला. त्यांच्या वडिलांचे नाव दत्तात्रय परशुराम थत्ते. ते रेल्वेत नोकरी करायचे. यदुनाथांच्या आईचे नाव होते इंदिरा. या दांपत्याला चार मुले झाली. सर्वात मोठी मुलगी कमल. त्यानंतर शांताराम, तिसरे यदुनाथ व सर्वात लहान मुकुंद. आज ह्यापैकी फक्त श्री. शांताराम थत्ते हयात आहेत.

थत्ते कुटुंब मूळचे कोकणातले. केतकी-जिवली हे त्यांचे गाव. या घराण्याचा खांदेरी-उंदेरी बंदराच्या परिसरात मोठा व्यापार होता. स्वत:ची गलबते होती. पुढे काही कारणांनी गलबते बुडाली. परिणामी व्यापारही बुडाला. नशीब आजमावण्यासाठी थत्ते कुटुंब देशावर येऊन स्थायिक झाले.

रेल्वेत नोकरी करणाऱ्या श्री. दत्तुकाकांच्या सतत बदल्या होत. ते उत्तर हिंदुस्थानात आग्रा येथे असताना तेथील सर्व लोक त्यांना 'बाबूजी' म्हणत. पुढे मुला-काकांमध्ये व जवळच्या नातेवाईकांमध्येही याच नावाचा प्रचार झाला. बाबूजी मोठे कार्यकुशल होते. आग्रा येथे असताना त्यांच्याच पुढाकाराने तेथे महाराष्ट्र मंडळाची स्थापना झाली. महाराष्ट्रातून जी जी मंडळी आग्र्याला जात ती आवर्जून बाबूजींना भेटत. ते सर्वांना आधारस्तंभ वाटत. इंदिराताईसुद्धा अगत्याने आल्या-गेल्याचे स्वागत करायच्या.

### भांगरवाडीत

काही वर्षांनी बाबूजींची बदली आग्र्याहून कल्याणला व कल्याणहून लोणावळा येथे झाली. थंड हवेचे ठिकाण असलेले लोणावळ्याचे स्वरूप त्या वेळी फारसे शहरी नव्हते. लोणावळ्याच्याच भांगरवाडी भागात एक बंगला भाड्याने घेऊन बाबूजींनी तेथे आपला संसार थाटला. यदुनाथ तेथील मराठी शाळेत शिकू लागला. हा १९२८-२९ चा काळ होता. नोकरीच्या धबडग्यातून वेळ काढून बाबूजी मुलांमध्ये मिसळायचे. त्यांना स्वत:ला विविध खेळ खेळण्याची, पोहण्याची, व्यायामाची खूप आवड होती. ते स्वत: खूप व्यायाम करीत. मुलांनाही करायला लावीत. त्यांची शरीरयष्टी त्यामुळे धडधाकट असे. राहणी अगदी साधी. जीवनक्रमात कमालीचा रेखीवपणा असायचा. यदुनाथवर वडिलांच्या या जीवनशैलीचा जाणता-अजाणता प्रभाव पडत होता.

भांगरवाडीचे जीवन मोठे मजेचे होते. पाऊस भरपूर पडायचा. त्यामुळे पावसाळ्यात शाळांना सुट्टी असे. मुले मग पावसातही हुंदडायला बाहेर पडत. मासे, खेकडे पकडणे, गाऱ्यागाऱ्या भिंगोऱ्या खेळणे, जवळच्या धरणावर भटकायला जाणे, हे उद्योग चालायचे. मुलांच्या या उद्योगात अधूनमधून बाबूजीही सामील होत. ते मुलांबरोबर विटीदांडू, लगोऱ्या खेळत. त्यांना पोहायला घेऊन जात. दऱ्या-खोऱ्यांतून व डोंगराच्या कडेकपारीतून त्यांच्याबरोबर भ्रमंती करीत. निसर्गाशी तादात्म पावण्याचे बाळकडू यदुनाथांना भांगरवाडीतच मिळाले.

बाबूजींना जशी निसर्गात रमण्याची आवड होती तशी पशु-पक्ष्यांशी मैत्री

करण्याचीही होती. त्यांनी एक व्यालेली गाय पाळायला आणली. ते स्वत: गायीची राखण करीत. दूध काढीत. यदुनाथ आणि भावंडं गायीचे धारोष्ण दूध आवडीने प्यायचे. वासराबरोबर रानोमाळ मस्तपणे हुंदडायचे.

भांगरवाडी तसे शांत गाव होते. गावाला सार्वजनिक जीवन फारसे नव्हतेच. सणासुदीला लोक एकत्र जमायचे तेवढेच. नोकरी करणारी माणसे आपआपल्या कामावर गेली की निम्मे गाव रिकामे व्हायचे. गावाजवळून वाहणाऱ्या इंद्रायणी नदीच्या काठी असलेल्या देवळाजवळ काही रिकामी माणसे गप्पा मारीत किंवा मासे पकडीत बसायची. नोकऱ्या करणारी माणसे आपआपल्या नोकऱ्यांमध्ये व बाकीची शेती किंवा अन्य उद्योगधंद्यांत मग्न असायची. सामाजिक जागृतीची एकच खूण होती ती म्हणजे लोकमान्य टिळकांनी सुरू केलेला गणेशोत्सव. मुलाबाळांसहित गावातील तरुण मुले व वयोवृद्ध लोकसुद्धा या गणेशोत्सवात उत्साहाने भाग घेत. लोणावळ्यात अनेक कार्यक्रम होत. भांगरवाडीचे लोक जमेल तेव्हा या कार्यक्रमांमध्येही सामील होत असत. यदुनाथ या सर्व उपक्रमांमध्ये उत्साहाने सहभागी होत असे.

गणेशोत्सवात विविध प्रकारच्या स्पर्धा व्हायच्या. खेळ व्हायचे. यदुनाथ त्यामध्येही भाग घ्यायचा. मूलत: त्याचा स्वभाव अन्य भावंडांपेक्षा खूपच शांत होता. पण केवळ स्वस्थ बसून राहणे हे त्याच्या स्वभावात नव्हते. कोणालाही उपद्रव न करता तो स्वत:ला वेगवेगळ्या गोष्टींत गुंतवून घेत असे.

भांगरवाडीतील शाळा लहान होती. तेथे फक्त चारच वर्ग होते. शाळेतले वळण अगदी जुन्या पठडीतले. शिक्षक मंडळी वेळ पडली तर अभ्यास न करणाऱ्या, खोड्या करणाऱ्या मुलांना भरपूर चोप द्यायची. गावात त्याविषयी कुणीही तक्रार करीत नसे. यदुनाथवर मार खाण्याची पाळी फारशी आली नाही. त्याचा अभ्यास नियमित असायचा. अर्थात त्या वेळच्या पहिल्या-दुसऱ्या इयत्तांना अभ्यास असून असून किती असणार? यदुनाथचे तिसऱ्या इयत्तेपर्यंतचे शिक्षण याच शाळेत झाले.

भांगरवाडीतील शालेय जीवन यथातथाच होते. अविकसित भागातल्या प्राथमिक शाळांमध्ये खूपच बेंगरूळपणा असतो. काही नवे उपक्रम मुलांना करू देण्याइतपत प्रेरणा देणारे गुरुजी अभावानेच आढळतात. सरधोपट मार्गाने शाळा चालतात. यदुनाथ याच वातावरणात वाढत होता. अभ्यासात त्याची विशेष प्रगती होती. बाकीचा वेळ बहुतांशी समवयस्कांशी खेळणे व घरातील किरकोळ कामे करणे यात जात असे.

## बाबूजींचा देहान्त

बाबूजींची प्रकृती तशी चांगली होती. पण एकदा नेहमीप्रमाणे ते ऑफिसमध्ये जाण्यासाठी निघाले आणि त्यांच्या हृदयात कळ आली. त्यांना आपल्या जागेवरून हलतासुद्धा येत नव्हते. घरात सर्वांची धावपळ उडाली. भांगरवाडीत कुणी डॉक्टर वगैरे नव्हतेच. लोणावळ्याला माणसं पाठवून डॉक्टरांना बोलाविले. जवळपासचे लोक, मित्रमंडळी मदतीला धावली. उपचार सुरू झाले पण प्रकृतीला आराम पडेना.

बाबूजींचे एक जिवलग मित्र होते – शंकरराव वैद्य. त्यांना दत्तुकाकांच्या आजाराची बातमी कळली व ते तातडीने त्यांना भेटायला आले. पण त्यांनाही हृदयविकाराचा झटका आला. आश्चर्य हे की संध्याकाळ होईपर्यंत दोघा मित्रांची प्राणज्योत मालवली! ते वर्ष होते १९३२. भांगरवाडीतला सर्वाधिक दु:खाचा दिवस. सारे गाव दोघांच्या प्रेतयात्रेला लोटले. येवल्याहून डॉ. साठ्ये, पुण्याहून नारायण परशुराम साठ्ये वगैरे मंडळी आली.

सर्व सोपस्कार आटोपल्यावर प्रश्न उभा राहिला आता पुढे काय? भांगरवाडीत राहण्यात काही अर्थ नव्हता. यदुनाथच्या आजी-आजोबांनी ठरवले की मुलीला व तिच्या मुलाबाळांना आपल्या सोबतच येवल्याला परत न्यायचे. सगळेजण येवल्याला परत आले.

येवल्याच्या लोकलबोर्डाच्या प्राथमिक शाळेत चौथीच्या वर्गात यदुनाथने प्रवेश घेतला. ते राष्ट्रीय चळवळीचे दिवस होते. येवल्यात राष्ट्रीय शाळा होती पण सरकारने ती बेकायदेशीर ठरवल्यामुळे बंद होती. त्या शाळेतले गुरुजी तुरुंगात सक्तमजुरी भोगत होते.

यदुनाथचे वडील मामा जगन्नाथ त्र्यंबक साठ्ये विलेपार्ले येथील सत्याग्रहाच्या छावणीत दाखल झाले. धाकट्या मामांनासुद्धा – बाळूमामा – सक्तमजुरीची शिक्षा ठोठावण्यात आली होती. ते धुळ्याच्या तुरुंगात होते. धुळे तुरुंग त्या वेळी महाराष्ट्राचे एक तीर्थस्थान बनला होता. श्री. गुलजारीलाल नंदा, विनोबाजी भावे, जमनालालजी बजाज, साने गुरुजी, लक्ष्मणशास्त्री जोशी, येवल्याचेच श्री. आपटे गुरुजी, बॅ. पुरुषोत्तमदास त्रिविक्रमदास या ज्येष्ठ श्रेष्ठ व्यक्तींसोबत खानदेशमधील अनेक कार्यकर्त्यांनी तुरुंग गच्च भरला होता. त्यात माझे काका धुळ्याचे ज्येष्ठ पत्रकार श्री. कांतीलालजी गुजराती, खानदेशचे गांधी श्री. बाळूभाई मेहता, कासाऱ्याचे श्री. यशवंतराव जीभाऊ वगैरे युवा मंडळीही होती.

यदुनाथचे वय त्यावेळी १०-११ वर्षांचे होते. देशात नेमके काय चालले आहे

याची जाण बाळगण्याचे ते वय नसले तरी आजूबाजूच्या वातावरणाचा प्रभाव त्याच्यावर पडतच होता. विशेषत: आजोबा आणि दोन्ही मामांच्या जीवनकार्याची जडणघडण त्याच्या डोळ्यांसमोरच होत होती.

सर्व जातिधर्माच्या लोकांसाठी डॉ. साठ्यांचा दवाखाना आणि घर चोवीस तास उघडे असे. त्यामुळे समानतेचा संस्कार यदुनाथवर आपोआपच घडत गेला.

डॉ. साठ्ये लोकमान्यांचे परमभक्त होते. त्यांनी १९३० च्या सुमारास येवल्याला राष्ट्रीय शिक्षणासाठी टिळक विद्यालय सुरू केले. टिळकांचे आणखी एक भक्त येवल्यात होते. ॲड. थत्ते. त्यांचे बरेच सहकार्य लाभले. त्यांनी श्री. पां. श्री. आपटे गुरुजींना येवले येथे आणले. आपटे गुरुजी त्या शाळेचे प्राचार्य झाले. टिळक आणि गांधी ही दोन्ही आपटे गुरुजींची दैवते होती. आपटे गुरुजींना वैशंपायन, दातार इत्यादी सेवाभावी शिक्षकांची साथ मिळाली आणि बघता बघता टिळक विद्यालयाची कीर्ती सर्वत्र पसरली.

टिळक विद्यालयाने अनेक चांगले प्रकल्प राबवले. मुलांच्या मनात स्वदेशीची भावना रुजवली. हा देश म्हणजे काय? देशाचे स्वातंत्र्य म्हणजे काय? याची शिकवण या शाळेने आपल्या विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबवली. न्यायनिष्ठा, सत्यप्रीती, समता, सर्वांबद्दल आपलेपणा, जातिधर्मातीत वृत्ती या सर्वांचे बाळकडू मुलांना या शाळेतून मिळत होते.

१९३०-३२ च्या राष्ट्रीय आंदोलनात या शाळेतले अनेक विद्यार्थी व शिक्षक सहभागी झाले होते. यदुनाथचे दोन्ही – मामा जगन्नाथ व बाळासाहेब – या शाळेचेच विद्यार्थी होते. खुद्द आपटे गुरुजींनीही तुरुंगवास भोगला.

## विनय मंदिर

श्री. आपटे गुरुजी १९३२ साली तुरुंगातून बाहेर पडले. बाहेर आल्यावर त्यांनी राष्ट्रीय शाळेचे रूपांतर 'विनय मंदिरा'त केले. हे 'विनय मंदिर' येवल्यातील राजकारणाचे, समाजकारणाचे केंद्र ठरले. आपटे गुरुजी हाडाचे शिक्षक होते. औपचारिक शिक्षणापेक्षाही त्यांचा भर अनौपचारिक शिक्षणावर अधिक होता. डॉ. साठ्ये विनय मंदिराचे पाठीराखे होते. त्यामुळे आपटे गुरुजी अनेक शैक्षणिक उपक्रम निर्भयपणे राबवीत. यदुनाथ, त्याची आई आणि भावंडे आता आपल्या मामांच्या घरात आली होती. यदुनाथ हळूहळू विनय मंदिरात जायला लागला. त्याला सर्व बाबतीत आपटे गुरुजींचे मार्गदर्शन लाभत होते.

आपटे गुरुजी खादीचे कपडे वापरीत. यदुनाथनेही खादी वापरायला सुरुवात

केली. ते मुलांना फार सुंदर गोष्टी सांगत. यदुनाथने त्यांच्याकडून ही कला घेतली. एकदा साने गुरुजी शाळेत आले होते. त्यांचे भाषण सुरू होण्याच्या आधी आपटे गुरुजींनी सर्वांना एक गाणे म्हणायला सांगितले. यदुनाथ म्हणायला लागला आणि त्याच्या मागे सर्वच मुले गायला लागली.

*स्वातंत्र्याचे आम्ही शिपाई*
*सुखवू प्रियतम भारतमाई!*

गुरुजींचीच कविता. मुलांच्या तोंडून ती ऐकताना गुरुजींना फारच आनंद होत होता. त्यांनी मुलांचे खूप कौतुक केले. पुढच्या सर्व आयुष्यभर यदुनाथवर या कौतुकाचा अमीट संस्कार राहिला.

एका बाजूला जसा स्वातंत्र्याचा लढा सुरू होता तसा दुसऱ्या बाजूला सामाजिक समतेचाही लढा सुरू होता. भारतीय समाजाला जातिप्रथेच्या कर्करोगाने पूर्णत: पोखरले होते. सामाजिक विषमता, धार्मिक अंधश्रद्धा, गरिबी आणि राजकीय गुलामगिरी यामुळे सारे राष्ट्रच अधोगतीला लागल्यासारखे झाले होते.

महात्मा फुले यांनी जातिभेदाच्या विरुद्ध खुले बंड पुकारले. धर्मव्यवस्थेचा आधार घेऊन समाजात विषमता आणि अन्यायाच्या परंपरा जतन करणाऱ्यांवर त्यांनी जहाल हल्ले केले. जड आणि निद्रिस्त असणाऱ्या समाजाला जागे करण्यासाठी आचार आणि विचारांचे असे रौद्र रूप आवश्यकच होते.

परदेशात उच्च शिक्षण घेऊन परत आलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी फुलेंचाच मार्ग चोखाळला. १९२३ साली ते मुंबईला आले. तेथेच त्यांनी आपली वकिली सुरू केली आणि सामाजिक समतेचा संगरही. २५ डिसेंबर १९२७ रोजी महाडचा सत्याग्रह आणि १९३० साली नाशिकच्या काळाराम मंदिराच्या सत्याग्रहामुळे त्यांचे नाव सर्वत्र दुमदुमू लागले. हा हिंदू समाज कधीतरी बदलेल, आपल्याला सन्मानाने आणि माणुसकीने वागवेल हा त्यांचा विश्वास हळूहळू ढासळू लागला होता. विशेषत: काळाराम मंदिर सत्याग्रहाच्या वेळी त्यांनी या समाजाचे उग्र सनातनी स्वरूप अनुभवले होते आणि त्यांचा पूर्ण भ्रमनिरास झाला.

बाबासाहेब १३ ऑक्टोबर १९३५ रोजी येवला येथे आले होते. तेथे दलित परिषद आयोजित करण्यात आली होती. परिषदेला साऱ्या महाराष्ट्रातून फार मोठ्या प्रमाणावर दलित मंडळी उपस्थित झाली. याच परिषदेत बाबासाहेबांनी घोषणा केली की, 'मी हिंदू म्हणून जन्माला आलो असलो तरी हिंदू म्हणून मरणार नाही.' त्यांनी त्यानंतर जवळपास २०-२१ वर्षांनी बौद्ध धर्माचा स्वीकार केला, पण त्यांच्या

धर्मांतराची ही पहिली जाहीर घोषणा होती.

यदुनाथवर या सभेचा खूपच परिणाम झाला. त्या वेळी येवल्याची नगरपालिका काँग्रेस पक्षाच्या ताब्यात होती. आपटे गुरुजींनी नगरपालिकेत ठराव करवून गावातल्या सर्व सार्वजनिक हौदांवर पाट्या लावल्या :

''येथे स्पृश्यास्पृश्य भेद मानला जात नाही.''

आजपर्यंत दलितांनी पाण्यासाठीही भीक मागण्याची प्रथा होती. सवर्ण त्यांना वरूनच पाणी वाढत. पण हौदांवर जाहीरपणे अशा पाट्या लावल्यावरसुद्धा अस्पृश्य समाजापैकी कुणाचीही हौदावर येऊन पाणी भरण्याची हिंमत होत नव्हती.

आपटे गुरुजींनी भाऊराव गायकवाड आणि अमृतराव रणखांबे या बाबासाहेबांच्या दोन सहकाऱ्यांना मुद्दाम बोलावून त्यांच्या हस्ते सर्व हौदांवरचे पाणी काढवले. हे पाणी सर्वांच्या समोर प्यायले आपटे गुरुजी, यदुनाथ व त्याचे काही वर्गमित्र.

आपल्याला जे पटेल ते निर्भयपणे करण्याचे व त्यासाठी कुणाच्याही पुढे मान न तुकवण्याचे हे शिक्षण यदुनाथला पुढे आयुष्यभर उपयोगी पडले.

आता तरी अस्पृश्य समाज न भिता हौदावर पाणी भरायला येईल, असे यदुनाथला व त्याच्या मित्रांना वाटले, पण तसे घडले नाही.

एकदा यदुनाथ शाळेत जात होता. हौदावर एक बाई कुणीतरी आपल्याला पाणी वाढावे यासाठी विनवण्या करीत होती. हौदावर दुसरे कुणीच नव्हते. यदुनाथ त्या बाईला म्हणाला, 'घ्या की खुशाल पाणी, मागायला कशाला हवंय? हौदावर पाटी लावली आहे, कुणालाही पाणी भरता येईल याची.' ती बाई म्हणाली, 'भाऊ ज्याने त्याने आपल्या पायरीने राहावं, पायीची वहाण पायीच बरी असते बघ.'

यदुनाथला कळेना काय उत्तर द्यावं ते.

तेवढ्यात तिने एक प्रश्न विचारला, 'भाऊ, दूध चांगलं की पाणी?'

'अर्थात दूध, ते पौष्टिक असते.'

'बरोबर, पण दूध कितीही चांगलं असलं तरी मासा त्यात जगत नाही. तो पाण्यातच जगतो. आमचंबी तसंच हाये.'

यदुनाथ हतबुद्ध झाला. शाळेत जाताना त्याच्या डोक्यात विचारांचे चक्र सुरू झाले. ही कशा तऱ्हेची मानसिक गुलामगिरी आहे? विषमतेच्या आणि अन्यायाच्या या भयंकर आगीत वर्षानुवर्षे होरपळणाऱ्या या समाजाला या अन्यायाची जाणीव होत नाही का? त्यांच्या मनात या विषमतेचे बीज कायमचे रोवून ठेवण्याचे भयंकर

कपट ज्यांनी केले त्यांना तरी कुणी जाहीरपणे जाब विचारणार आहे की नाही? ज्या हौदावर कुत्री-मांजरीही निर्धोकपणे पाणी पिऊ शकतात तेथे अस्पृश्य-दलित का पिऊ शकत नाहीत? ती काय आमच्यासारखी हाडामांसाची माणसे नाहीत? मग यांच्यासाठी हा वेगळा न्याय कशासाठी? कुणामुळे?

यदुनाथचे मन विचारी होते. अशा काहीही शंका असल्या की तो सरळ आपटे गुरुजींकडे जाऊन त्यांचे निरसन करून घेत असे.

राष्ट्रीय शाळा बंद पडली म्हणून आपटे गुरुजी थांबले नाहीत. त्यांनी त्यांच्या विनय मंदिरात एक मुक्तद्वार विद्यालय सुरू केले. यदुनाथ आणि त्याचे काही सहकारी यांना विनय मंदिराची दारे सतत उघडी असत. तेथे वेगवेगळी वर्तमानपत्रे असत, पुस्तके असत. यदुनाथने ती सर्व पुस्तके वाचून काढली.

आपटे गुरुजींच्या प्रेरणेनेच गावात सार्वजनिक गणेशोत्सव पार पडे. त्या वेळी साऱ्या महाराष्ट्रातून अनेक विद्वान वक्ते येवल्यात येत असत.

साने गुरुजी, आचार्य दादा धर्माधिकारी, पं. दिनकरशास्त्री कानडे यांसारख्यांचा येवल्यात राबता असे. त्यांना मनसोक्तपणे ऐकण्याचे भाग्य यदुनाथला लाभले. हळूहळू त्याचा एक वैचारिक पिंड तयार होऊ लागला. आपटे गुरुजी या विद्यार्थ्यांमध्ये मिळून मिसळून वागत. ते त्यांच्याशी वेगवेगळे खेळ खेळत. त्यांना गोष्टी सांगत. अडीअडचणीला सल्ले देत. आपटे गुरुजी एक सर्वंकष व्यासपीठ होते. यदुनाथच्या जीवनावर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा खूप प्रभाव पडला. याच शाळेत यदुनाथने वक्तृत्वाचे धडे गिरवले. शाळेच्या ग्रंथालयाचे काम स्वत: होऊन पत्करले व जमेल तेवढी पुस्तके वाचून काढली. हिंदी व उर्दू भाषा शिकण्याचा प्रयत्न केला.

हे सर्व करीत असताना अभ्यासाकडे त्याचे अजिबात दुर्लक्ष नव्हते. बहुतांशी पहिल्या चार विद्यार्थ्यांमध्ये त्याचा नंबर असे.

शाळेच्या हस्तलिखितांचे संपादन करताना यदुनाथने संपादनकार्याचेही धडे गिरविले. लेखनाची सवय होतीच. 'मौज' आणि 'पौर्णिमा'त यदुनाथच्या गोष्टी प्रकाशित होऊ लागल्या. त्याच्यातल्या लेखकाला हळूहळू आकार प्राप्त होत होता. 'एका रात्रीत देऊळ' ही यदुनाथची पहिली कथा म्हणता येईल.

### निर्भय व साहसी

डॉ. साठ्येंच्या व विनय मंदिराच्या सहकार्याने सेवादलाची एक शाखा येवल्यात सुरू करण्यात आली होती. आधी मुलं यायला घाबरत. पालकही या शाखेत मुलं पाठवायला घाबरत असत. यदुनाथ, गोविंद (पुण्याचे ॲड. गोविंद

उंदिरवाडकर) इत्यादी १०-१२ मुलं मात्र नित्य नेमाने शाखेवर उपस्थित राहात. साहस, समयसूचकता यांचे धडे या शाखेवर गिरवले जात होते.

येवल्यात त्या वेळी एका बोहऱ्याचा फटाके बनविण्याचा कारखाना होता. एका लहानशा घरात असलेल्या या कारखान्याला मागचे-पुढचे दार व दोन खिडक्या होत्या. एकदा जेवायला जाताना मालकाने दोन्ही दारांना कुलूप लावले व तो निघून गेला. कामगार स्त्रिया व पुरुषांना याची सवय होती. पण कशी कोण जाणे कारखान्याला अचानक आग लागली. सर्वत्र भयंकर धूर झाला. कारखान्यात गदारोळ माजला. दारे बंद असल्यामुळे कामगारांना बाहेरही पडता येत नव्हते.

यदुनाथची शाळा (म्युनिसिपल हायस्कूल) जवळच होती. शाळेतल्या मुलांनी कारखान्यातला आरडाओरडा ऐकला पण काय करावं ते त्यांना सुचेना. यदुनाथ, गोविंद वगैरे दोन-चार मुलं मात्र मोठ्या हिमतीने पुढे झाली. यदुनाथने जवळ पडलेला मोठा लाकडी वासा उचलला. तोंडाला रुमाल बांधून तो शेजारच्या इमारतीच्या धाब्यावरून कारखान्याच्या खिडकीपर्यंत पोहचला. हातातल्या त्या लाकडी वाशाने त्याने खिडकी फोडली. इतर मुलांनी दुसऱ्या खिडकीला भगदाड पाडले, फटाक्यांचा विषारी धूर भपकन बाहेर पडला. लोकांनी पाणी टाकून बाकीची आग विझविली. १२ मजुरांपैकी ७ जण विषारी वायूने गुदमरून मरण पावले होते. पण बाकींचे वाचले ते यदुनाथच्या व त्याच्या मित्रांच्या धैर्यामुळे.

गावकऱ्यांनी यदुनाथचे मनापासून कौतुक केले. गावातल्या गणेशोत्सवालासुद्धा यदुनाथमुळे एक विधायक वळण लागले होते.

## आधी शिक्षण पूर्ण कर!

१९३५ साली यदुनाथची व साने गुरुजींची प्रत्यक्ष भेट झाली. त्यांच्याकडून एकदा यदुनाथने थोर क्रांतिकारक भगतसिंगची कथा ऐकली. त्याच्या कोवळ्या मनावर त्या कथेचा फार परिणाम झाला. त्याने आपटे गुरुजींना सांगितले की, ''भगतसिंगची कथा ऐकल्यानंतर मला काही सुचत नाही. मला देशाकरता काही तरी करावयाचे आहे.'' आपटे गुरुजी म्हणाले, ''तू अजून लहान आहेस. शिक्षण पूर्ण कर आणि नंतर स्वातंत्र्याच्या चळवळीत जा. मीच तुला पाठवीन.''

यदुनाथने आपटे गुरुजींची आज्ञा प्रमाण मानली. अगदी नियमितपणे अभ्यास करून तो १९४१ साली मॅट्रिकच्या परीक्षेत प्रथम वर्गात उत्तीर्ण झाला. यदुनाथचे भाषा विषय चांगले होते. पण त्याला मनापासून आवडायचे ते विज्ञान आणि गणित. या दोन्ही विषयांत त्याला ८० टक्क्यांपेक्षा अधिक गुण मिळाले. आता काय

करायचे? यदुनाथने आपटे गुरुजींचा सल्ला घेतला. ते म्हणाले, ''तू आता शिकायला पुण्याला जा. तेथल्या प्रसिद्ध सर परशुरामभाऊ कॉलेजमध्ये विज्ञान शाखेत प्रवेश घे.''

येवला सोडून यदुनाथ पुण्यात आला. एस. पी. कॉलेजमध्ये त्याचे शिक्षण सुरू झाले. पुण्यात त्याच वेळी राष्ट्रसेवादलाची स्थापना होत होती. वर्ष होते १९४०-४१. यदुनाथ स्थापनेच्या दिवसापासून राष्ट्रसेवादलाच्या शाखेवर जाऊ लागला. नाना डेंगळे, वसंत बापट, लालजी कुलकर्णी, ग. प्र. प्रधान, बापू काळदाते, लीलाधर हेगडे हे सर्व त्याचे त्या शाखेत झालेले मित्र. श्री. नानासाहेब गोरे, एस. एम. जोशी, रावसाहेब पटवर्धन, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, आचार्य जावडेकर यांच्या मार्गदर्शनाखाली त्याचा बौद्धिक विकास होत होता. १९४३ साली यदुनाथ इंटर सायन्स पास झाला.

देशात सर्वत्र स्वातंत्र्याचे वारे खेळत होते. अगदी लहान मुलांपासून तर थेट वयस्क लोकांपर्यंत बहुतेकांना आपण देशाकरता काहीतरी केले पाहिजे असे प्रकर्षाने वाटत होते. यदुनाथ आणि त्याच्या सेवादलातील समवयस्क मित्रांनी तर देशकार्याला वाहून घेण्याचा निर्धार केला होता.

८ ऑगस्ट १९४२ रोजी मुंबईत अ. भा. काँग्रेस कमिटीचे अधिवेशन भरले. गांधीजी स्वातंत्र्याचा सर्वंकष लढा आता सुरू करतील याची जाणीव देशभरातल्या कार्यकर्त्यांना झाली होती. त्यामुळे अधिवेशनाला सगळ्या भारतातून फार मोठ्या संख्येने युवक व युवतीही आल्या. यदुनाथही आपल्या मित्रांसमवेत या अधिवेशनाला उपस्थित होता. गांधीजींनी 'करो या मरो'चा संदेश दिला. त्यांचे भाषण एखाद्या विजेच्या लोळाप्रमाणे लोकांवर आदळत होते.

''या क्षणापासून तुमच्यापैकी प्रत्येक स्त्री-पुरुषाने आपण स्वतंत्र झालो आहोत असे समजले पाहिजे... संपूर्ण स्वातंत्र्याशिवाय माझे अन्य कशानेही समाधान होणार नाही... आपण भारताला स्वतंत्र तरी करू किंवा हे भगीरथ प्रयत्न करीत असताना मरून तरी जाऊ.''

यदुनाथ आणि त्याच्या मित्रांवर गांधीजींच्या या भाषणाचा खूप परिणाम झाला. दुसऱ्या दिवशी साऱ्या देशभर पुढाऱ्यांची धरपकड सुरू झाली. गांधीजी, पं. नेहरू, मौलाना आझाद, सरदार पटेल सारेच पकडले गेले. ठिकठिकाणी लाठीमार, अश्रुधूर, गोळीबार यांचे थैमान माजले. प्रचंड मिरवणुका निघाल्या. सरकारने काहीही करून जनतेचा हा उठाव दडपून टाकण्याचे ठरवले होते.

पण जनताही निर्भय बनली होती. पुण्यात कॉलेजच्या मुलांनी प्रचंड मिरवणूक काढली. मिरवणुकीत यदुनाथ त्याच्या केशव ठाकूर या मित्रासोबत सामील झाला होता. पोलिसांनी मिरवणुकीवर तुफान लाठीमार केला. यदुनाथलाही लाठ्यांचा प्रसाद मिळाला. पण त्यांच्यापैकी कुणीही परत फिरले नाहीत.

## सहा महिने सक्तमजुरी

आता यदुनाथने व त्याच्या दोन मित्रांनी खेडोपाडी जाऊन गांधीजींचा हा संदेश पोहचवण्याचे कार्य केले. त्या दोन मित्रांची नावे होती धोंडीराम भावसार व केशव भारती. पंधरा दिवस ते गावोगावी हिंडले. शेवटी अंदरसूल या गावी त्यांना अटक झाली. त्यांना सहा महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा ठोठावण्यात आली व धुळ्याच्या तुरुंगात डांबण्यात आले.

धुळे जेल त्या वेळी 'गीताप्रवचना'चे जन्मस्थान म्हणून प्रसिद्ध होता. साने गुरुजी, जमनालाल बजाज, गुलजारीलाल नंदांसारखी मोठमोठी माणसे तेथे कैदेत होती. पण गुरुजींना तेथून लगेच त्रिचनापल्लीला हलविण्यात आले.

यदुनाथने तुरुंगात सेवादल सुरू केले. सर्व कामे स्वावलंबनाने पार पाडायचा पायंडा त्याने पाडला. पुढे सहा महिन्यांच्या सजेत २०-२१ दिवसांची सूट मिळाली व यदुनाथ तुरुंगाबाहेर आला.

आता राहिलेले शिक्षण पूर्ण करणे व सेवादलाचे काम वाढवणे हेच मुख्य ध्येय होते. मध्यंतरी आजारामुळे एक वर्ष वाया गेले.

१९४७ साली यदुनाथला मुंबई विद्यापीठाची बी.एस्सी. पदवी मिळाली.

एक वर्ष सेवादलाला द्यायचे असे ठरल्यामुळे यदुनाथने खानदेशातील धुळे, जळगावला प्रयाण केले. दरम्यान त्याने प्रयत्नपूर्वक हिंदी, उर्दू आणि गुजराती ह्या भाषा शिकून घेतल्या होत्या. पैकी हिंदी आणि गुजरातीवर त्याचे प्रभुत्व होते. उर्दू चांगलं शिकण्याची मात्र त्याची इच्छा अपूर्ण राहिली.

काही दिवसांनी साने गुरुजींचा निरोप आला, ''साधनेच्या कामासाठी मुंबईला ये.'' आणि यदुनाथ खानदेश सोडून मुंबईत दाखल झाला. तारीख होती १४ जानेवारी १९४९.

मुंबईत 'साधने'चे बस्तान बसले नाही. दोन वर्षांनी 'साधने'चे कार्यालय पुण्यात आले व त्याचबरोबर यदुनाथही पुण्यात दाखल झाले.

## खानदेशात

यदुनाथ खानदेशात सेवादलाचे पूर्णवेळ सेवक म्हणून काम करीत होते.

कामाच्या निमित्ताने त्यांचे अंमळनेरलाही जाणे व्हायचे. अंमळनेरला त्या वेळी तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक श्री. माधव रामचंद्र ओक हे डॉ. म्हसकरांच्या वाड्यात राहात असत. जळगावच्या लेखिका श्रीमती गिरजाबाई केळकरांची कन्या ही त्यांची पत्नी. ओकांना ८ अपत्ये होती. सात बहिणी व एक सर्वात छोटा भाऊ. त्यातली दोन क्रमांकाची मुलगी जान्हवी. प्रा. ओक पूर्वी जयपूरला नोकरी करीत होते. आपल्या वरिष्ठांशी पटले नाही म्हणून ते अंमळनेरला परत आले. प्रताप शेटजींनी त्यांना तत्त्वज्ञान मंदिरात नोकरी दिली. त्या वेळेला त्या संस्थेचे नाव 'भारतीय संस्कृती' होते.

घरातलं एकूणच वातावरण अभ्यासू असल्यामुळे जान्हवीचे लेखन-वाचन व शिक्षण सुरू राहिले. १९४८ साली जान्हवी ज्यु. बी. ए. ला असताना राष्ट्रसेवादलाचे एक प्रांतिक शिबिर असल्याचे पत्र घरी आले. राष्ट्रसेवादलाशी ओक घराण्याचा तसा संबंध होताच. श्री. भाऊसाहेब रानडे तेथे अनेकदा येत. सेवादलाच्या महिला-प्रमुख इंदू केळकरांच्या मातोश्री डॉ. यशोदाबाई भट या जान्हवीच्या आईच्या मैत्रीण. त्यामुळे सेवादल ओक घराण्याला अपरिचित नव्हते. राहुरीला झालेल्या या शिबिरात जान्हवीचा अनुताई लिमये, सुधा डेंगळे इत्यादींशी घनिष्ठ परिचय झाला.

वातावरण स्वातंत्र्यलढ्याचे होते. जान्हवीचाही त्यात सहभाग असायचा. म्हसकरांकडे आलेली बुलेटिन्स वाटण्याचे काम ती उत्साहाने करायची.

१९४८ च्या नोव्हेंबर मध्ये राष्ट्रसेवादलाची एक स्वतंत्र शाखा जान्हवीने सुरू केली. या शाखेवरच एकदा यदुनाथ व जान्हवीची गाठ पडली. परिचयानंतर दोघांनी लग्न करायचे ठरवले. जान्हवीने सांगितले, 'लग्न अगदी साधेपणाने होईल व आई-वडिलांवर खर्चाचा कुठलाच बोजा पडायला नको.'

यदुनाथने सांगितले की 'आयुष्यभर सोनं अंगाला लावायचं नाही!' दोघांना एकमेकांच्या अटी मान्य होत्या.

### लग्न

यदुनाथ-जान्हवीचं लग्न जेवढ्या साधेपणाने झाले तेवढा साधेपणा नंतर कुठल्याही लग्नात पाहिला काय, ऐकलासुद्धा नाही!

प्रा. ना. य. डोळे या लग्नाचे एकमेव साक्षीदार होते. त्यांच्याच शब्दांत : ''एकदा भर दुपारी ३ वाजता यदुनाथ माझ्या घरी आले. कपडे नेहमीप्रमाणे म्हणजे बिनइस्त्रीचे, खादीचे, मोठमोठ्या खिशांचे. मला म्हणाले, ''सायकल घे आणि चल.'' मी काही न विचारता निघालो. लक्ष्मी रोड, दारूवाला पूल ओलांडून

ससूनजवळ आलो. मी विचारले, ''आपण कोठे जात आहोत?''

यदुनाथ म्हणाले, ''लग्नाला.''

मी विचारले, ''लग्नाला? कुणाच्या?''

यदुनाथ म्हणाले, ''माझ्या''

आम्ही कलेक्टर ऑफिसमधल्या रजिस्ट्रारच्या ऑफिसात पोहचलो. जान्हवी आणि तिची मैत्रीण दोघी सायकलवरूनच तेथे आलेल्या होत्या. यदुनाथने आपल्या भावी वधूचा – जान्हवीचा – परिचय करून दिला. वधूचे कपडेही खादीचे आणि साधेच होते.

यदुनाथनी या लग्नासाठी आवश्यक ती नोटिस देऊन लग्नाचा दिवस व मुहूर्त निश्चित केला होता. आम्ही चौघेच–वधू-वर आणि दोन साक्षीदार–रजिस्ट्रार समोर गेलो. त्याने शपथा सांगितल्या त्या वधू-वरांनी म्हटल्या. आमच्या सह्या घेतल्या आणि नेहमीच्या सवयीने सांगितले, ''आता परस्परांना हार घाला.''

''हारबिर काही नाही.'' यदुनाथ.

रजिस्ट्रार बघतच राहिला. जे लोक दोन हार आणत नाहीत त्यांच्याकडून पेढ्यांची अपेक्षा काय करणार? त्याने मग पेढ्यांचा विषय काढला नाही.

''ठीक आहे नमस्ते!'' असे रजिस्ट्रारला सांगून आम्ही बाहेर पडलो. आम्ही काही वाहन वगैरे तरी आणले आहे की नाही हे पाहण्यासाठी तो अधिकारी मुद्दाम बाहेर आला. आम्ही चौघेजण आपआपल्या सायकलवर बसून जात असलेले पाहून त्याला फार आश्चर्य वाटले असावे.

लग्न झाल्यावर आमची चौघांची वरात सायकलवरून सदाशिव पेठेतील यदुनाथच्या खोलीकडे निघाली. तेथे पोहचल्यावर यदुनाथ-जान्हवीने आम्हाला निरोप दिला. लग्नानिमित्त चहा-पेढे वगैरे काही नाही!!

इतक्या साधेपणाने झालेल्या या लग्नात तसे बेकायदेशीर काहीच नव्हते. म्हणजे कोणाला कळू नये असाही काही प्रकार नव्हता. तर एका तत्त्वनिष्ठ माणसाचा कथनी आणि करणी समान ठेवण्याचा आग्रह होता.''

यदुनाथांच्या विवाहासंबंधीची एक मनोज्ञ आठवण श्री. पन्नालाल सुराणा यांनी नोंदवली आहे. पन्नालालजी, यदुनाथ, बापू काळदाते या सर्वांचा तेव्हा परस्पर पत्रव्यवहार पुष्कळच असे. कुठल्यातरी कामानिमित्त पन्नालाल यांना एक कार्ड लिहून ते पोस्टात टाकायला बापू काळदाते यांनी यदुनाथांकडे दिले. कार्डाच्या राहिलेल्या कोऱ्या जागेत यदुनाथांनी दोन ओळी लिहिल्या :

''शिबिरात बापू भेटला, तुला लिहायला घेतलेले कार्ड टाकायला त्याने माझ्याकडे दिले. त्याचाच उपयोग करतो. मी आणि जान्हवीने लग्न करण्याचे ठरविले आहे.''

पन्नालालजी पुढे लिहितात, ''मला व वीणाला आश्चर्य वाटले. एवढ्या मोठ्या माणसाने आपल्या वैयक्तिक आयुष्यातील इतकी महत्त्वाची बातमी इतक्या साधेपणाने पण आपण होऊन आम्हाला कळवली होती.''

साधेपणाचा हा वारसा पुढे आयुष्यभर टिकून राहिला. त्यात कुठल्याही कारणाने कसलाही बदल झाला नाही. कितीतरी वर्षे ते 'साधने'त सायकालीवरूनच ये-जा करीत. साठीच्या वेळी आग्रहाने मित्रांनी एक स्कूटर घेऊन दिली. आठवड्याभरात यदुनाथांनी ती 'साधने'त आणून ठेवून दिली. 'साधने'च्या अत्यावश्यक कामासाठी ती वापरली जाई.

त्यांची पन्नाशी उलटली त्या वेळी त्यांच्या घरात पहिला फॅन आला. तोसुद्धा आग्रहाने मित्रांनी दिला म्हणून! घरात असलेला रेडिओही सुहिताच्या मामांकडे असलेला जुनाच होता.

अपरिग्रहाच्या व्रताचे यदुनाथांनी शेवटच्या श्वासापर्यंत कसोशीने पालन केले.

प्रथमत: ज्या खोलीत त्यांचा हा जगावेगळा संसार सुरू झाला ती कशी होती?

''बाहेरच्या अंगाला असलेल्या डुगडुगत्या लाकडी जिन्यानं खोलीत पोहचलं की भरपूर हवा आणि उजेड यांचा सहज मुक्त लाभ होत असे. चारी बाजूंच्या भेगाळलेल्या भिंतींनी वरचं पत्र्याचं छप्पर कसंबसं तोलून धरलेलं होतं. खिडक्या आणि दारं यांनाही मुबलक फटी होत्या. अनेक वर्षे दुरुस्तीचा हात न फिरल्यामुळे ती जीर्णशीर्ण आजाऱ्यासारखीच झाली होती.'' आणि तरीही ही खोली सेवादलातल्या अनेक कार्यकर्त्यांचे कायमचे आश्रयस्थान होती. माईने (जान्हवीताईंचं सर्वप्रिय असलेलं नाव) फकिराचा हा संसार फार समर्थपणे सांभाळला. कितीतरी वर्षे इकडे तिकडे व भाड्याच्या घरात राहणारे थत्ते दांपत्य आयुष्याच्या उतारवयात पत्रकार नगरातल्या स्वत:च्या घरात स्थिरावू शकले.

*

# जडणघडण आणि संस्कार

शालेय शिक्षण सुरू असतानाच यदुनाथांवर राष्ट्रसेवेचे व समाजसेवेचे संस्कार होत होते. त्यांचे आजोबा, दोन्ही मामा आणि आपटे गुरुजींचा हे संस्कार घडविण्यात फार मोठा वाटा होता. जाणता-अजाणता यदुनाथांच्या जीवनातल्या बहुतेक मोठ्या निर्णयावर आपटे गुरुजींच्या जीवनशैलीचा प्रभाव होता. त्यांची अत्यंत साधी राहणी, देशाविषयीचे उत्कट प्रेम, गरिबांविषयीचा जिव्हाळा, शिक्षणप्रचाराची तळमळ या सर्वांची छाया यदुनाथांच्या जीवनावर स्पष्टपणे पाहायला मिळते. त्या काळातल्या बहुतेक मोठ्या नेत्यांची भाषणे त्यांनी प्रत्यक्षत: ऐकली होती. साने गुरुजींच्या आसपास अनेक लहानमोठ्या सेवाभावी कार्यकर्त्यांचा घोळका असे. त्यांच्याही वागण्या-बोलण्याचे कळत-नकळत संस्कार होतच असत. पण यदुनाथांवर सर्वांत जास्त प्रभाव होता साने गुरुजींचाच.

राष्ट्रसेवादल स्थापन झाले १९४१ साली. यदुनाथ पहिल्या दिवसापासूनच सेवादलात सामील झाले होते. एस. एम. बंडू गोरे, शिरुभाऊ लिमये ही नेतेमंडळी वयाने त्याच्यापेक्षा वडील होती. संघर्षाच्या मार्गानेच स्वराज्य मिळेल असे मानण्याचे व त्याचप्रमाणे वागण्याचे या नेत्यांचे वय होते. सेवादलामुळे तत्कालीन युवक-युवतींवर खऱ्या राष्ट्रवादाचे संस्कार होत होते. 'स्वराज्य सुखासुखी मिळणार नाही त्यासाठी सर्वस्वाचा होम करावा लागेल. वेळप्रसंगी आपले प्राणही द्यावे लागतील' असे सेवादलाच्या बौद्धिकांमध्ये सतत ऐकायला मिळे. यदुनाथांचे मन त्या दिशेने विचार करीत असे.

जून १९४२ मध्ये एस. एम. व शिरुभाऊ लिमये यांनी महाराष्ट्रातल्या काही

निवडक कार्यकर्त्यांचे एक शिबिर पुण्यात घेतले. त्यात कुठलीही प्राणहानी न करता घातपाती कारवाया करून इंग्रज सरकारला जेरीला आणण्याचा कार्यक्रम ठरला. पण ८ ऑगस्टला मुंबईत अखिल भारतीय काँग्रेस कमेटीचे अधिवेशन भरले होते. त्यात अन्य तरुणांसोबत यदुनाथही होता. या अधिवेशनात झालेल्या महात्मा गांधींच्या भाषणाचा उपस्थित सर्व युवकांवर खूपच प्रभाव पडला. त्या दिवशी हे तरुण जे राष्ट्रीय प्रवाहात ओढले गेले ते कायमचेच.

नंतर राष्ट्रसेवादलाची पंचसूत्री झाली–विज्ञाननिष्ठा, धर्मनिरपेक्षता, राष्ट्रवाद, जनसत्ता आणि समाजवाद. यदुनाथच्या आयुष्यात या पाचही गोष्टींचे महत्त्व क्रमाक्रमाने वाढत गेले. त्याच्या विचार आणि आचारात थोडाही विसंवाद नसायचा. त्यामुळे वेळप्रसंगी कुणालाही स्पष्टपणे सुनावणे त्याला शक्य होई. सेवादलाच्या शाखांवर शिस्त पाळण्याचे आणि स्वतंत्र बुद्धीने विचार करण्याचे बाळकडू त्याला मिळालेच होते. तो स्वत: तर शिस्त पाळीच पण इतरांनीही शिस्तपालनात कुचराई केलेली त्याला चालत नसे.

१९४२ साली यदुनाथसह अनेक सत्याग्रही धुळे तुरुंगात होते. दर रविवारी सत्याग्रहींचे सामुदायिक झेंडावंदन होई. पहिल्या रविवारी जे झेंडावंदन झाले ते फारच विस्कळीतपणे व अतिशय गचाळ पद्धतीने झाले. तथाकथित सत्याग्रहींना धड नीट उभे राहणेही ज्ञात नव्हते. ते कसेही बेंगरूळपणे उभे होते. झेंडागीत आणि राष्ट्रगीत क्रमाने एका सुरात सामूहिकपणे म्हणणेही त्यांना शक्य होत नव्हते. गीतांच्या ओळी पुढे-मागे होत. कुणी तारस्वरात गात तर कुणी नुसते पुटपुटल्यासारखे करीत.

२०-२२ वर्षांच्या युवा यदुनाथला ही बेशिस्त मुळीच आवडली नाही. पुढच्या रविवारी झेंडावंदन पार पाडण्याचे काम त्याने स्वत:कडे घेतले. शिस्तबद्ध मासिक झेंडावंदनाची प्रथा सेवादलानेच पाडली होती. त्या अनुभवाचा त्याला लाभ झाला. झाडून साऱ्या तथाकथित सत्याग्रहींना त्याने व त्याच्या तरुण सहकाऱ्यांनी झेंडावंदनाला आवश्यक अशी जुजबी कवायत शिकवली. लहान-मोठा असा भेद केला नाही. सर्वांना झेंडागीत आणि राष्ट्रगीत एका स्वरात शिस्तीत म्हणायला लावले!

सेवादल जसे सेवा करायला शिकवायचे तसे स्व-सन्मानाची रक्षा करणेही शिकवायचे.

१९४० च्या डिसेंबर महिन्यात दैनंदिन मैदानी कार्य कसे चालवावे याचे शिक्षण

देणारे एक शिबिर नाशिक येथे आयोजित करण्यात आले होते. शिबिर काँग्रेस कार्यकर्त्यांचे होते. यदुनाथला इन्सट्रक्टर म्हणून सेवादलातर्फे पाठविण्यात आले. यदुनाथ पोहचला तेव्हा तेथे काँग्रेसच्या एका संकल्पित शिबिराची चर्चा चालू होती. शिबिरासाठी त्यांना सेवादलाचे स्वयंसेवक हवे होते पण स्वयंसेवक म्हणून नव्हे तर वाढपे, पाणके आणि सतरंज्या-जाजमे घालणारे म्हणून. यदुनाथांनी स्वत:च या अनुभवाविषयी पुढे लिहिलंय :

''या प्रश्नावरून काँग्रेस नेत्यांशी माझे बरेच वाजले. मी त्यांना सांगितले की तुम्ही एक जाजम उचलायला पुढे सरसावलात तर आम्ही अवश्य बाकीची कामे उरकून घेऊ. पण तुम्ही बसल्या बसल्या नुसते हुकूम सोडणार असाल तर सेवादल सैनिक कामाला हात लावणार नाहीत. नोकर आणि स्वयंसेवक यातला फरक तुम्हा पदाधिकाऱ्यांना नीट समजला पाहिजे. नोकरासारखे राबायला फुकटची माणसे मिळावीत यासाठी सेवादल नाही. सेवादल कुठल्याही कामाची लाज बाळगत नाही पण सेवादलाला स्वतंत्र भूमिका आहे. जातिधर्मातीत राष्ट्रवादाचा निष्ठा म्हणून स्वीकार केलेले कार्यक्षम, निष्ठावान, समर्पण वृत्तीचे कार्यकर्ते निर्माण करणारी सेवादल ही बिनभिंतीची निरंतर चालणारी शाळा आहे. माझ्या या परखड बोलण्याने ते नाराज झाले.''

असा परखडपणा यदुनाथ प्रसंगोपात व्यक्त करीत असे पण त्यात अहंकाराचा कुठलाही दर्प नसे. सेवादल त्याच्या रक्तात सर्व मूल्यानिशी व तत्त्वानिशी किती भिनलेले होते याचे असे प्रसंग निदर्शक असत. त्याच्या मानी आणि मनस्वी स्वभावाला गैरशिस्त, अजागळपणा खपत नसे. मतभेद झाले तर शांतपणे बाजूला होणे त्याला जमे. पण नसती तडजोड तो करीत नसे.

सेवादलाने यदुनाथला जिवाभावाचे अनेक साथीदार दिले. पुढे आयुष्यभर ही मित्रमंडळी त्यांच्यासोबत कार्यरत राहिली. त्या वेळी पुण्यातला अवस्थीवाडा हे या सर्व समवयस्क मित्रांचे एकत्र जमण्याचे ठिकाण होते. सेवादलाची शाखाही तेथेच भरत असे. गोपाळ अवस्थी, कृष्णा कापसे, लालजी कुलकर्णी, अप्पा मायदेव, भाई वैद्य ही सर्व चळवळी मंडळी अवस्थीवाड्यावर जमत. यदुनाथही त्यांच्यात सामील झाला होता. आपटे गुरुजींचा शिष्य व तुरुंगात जाऊन आलेला यामुळे यदुनाथला समवयस्क मंडळी खूप मानत. शाखेवर त्या वेळी यदुनाथ वैज्ञानिकांच्या कथा खूप रंजकपद्धतीने सांगे. या कथा-कथनातूनच पुढे त्याच्या वैज्ञानिकांविषयीच्या पुस्तकांचा जन्म झाला.

राष्ट्रसेवादलातले अनेक सर्ववेळ सेवक त्या वेळी महाराष्ट्रातल्या वेगवेगळ्या जिल्ह्यात सेवादलाचे कार्य करून जनजागृती करीत. यदुनाथवर खानदेशाची जबाबदारी टाकण्यात आली. विशेषत: जळगाव जिल्ह्याची. या जिल्ह्यात व त्यातल्या लहानमोठ्या खेड्यांमध्ये यदुनाथचे काम किती नेटाने व शिस्तबद्धपणे चाले याची सुप्रसिद्ध लेखिका नलिनी साधले यांनी लिहिलेली एक आठवण पुढे देत आहे.

एक वर्षभर ते जळगावच्या एम. जे. कॉलेजमध्ये डेमॉन्स्ट्रेटर होते. पुढे लाल निशाण गटात गेलेले वसंतराव रत्नपारखी, यदुनाथ व भास्कर भाल्डे काही काळ एकाच रूममध्ये राहात असत. श्रीमती साधले आपल्या लेखात लिहितात :

''त्यांचं पहिलं दर्शन झालं ते जळगावी राष्ट्रसेवादलाच्या शाखेवर. सेवादलाचे पूर्णवेळ कार्यकर्ते म्हणून यदुनाथजी खानदेशात आलेले होते. स्थानिक कार्यकर्त्यांच्या प्रेरणेतून जळगावात राष्ट्रसेवादलाची एक स्त्री-शाखा सुरू झालेली. जिथे रोज संध्याकाळी मी काही मैत्रिणींसह नेमाने जात असे. वय दहा-बारा वर्षांचे असावे. वीस-पंचवीस मुली शाखेवर जमत असत. तीन-चार दिवसांपासून शाखानायक म्हणून नेमलेली मुलगी येत नव्हती. देवापुढे संध्याकाळी दिवा लावणे ज्या भाविकतेने, गांभीर्याने होत असे त्याच भाविकतेने ठरावीक वेळी ध्वज फडकवणे आणि नंतरची ध्वजवंदना होत असे. त्या दिवशी आम्ही खेळण्याच्या नादात होतो. वेळ टळून गेलेली होती. संध्याकाळच्या प्रकाशात दुरून दमदार पावलं टाकीत पांढऱ्या खादीच्या वेशातली एक आकृती आमच्या दिशेनं येताना दिसली. आम्ही सर्वजणी सावध झालो. झेंडा लावण्याचं कुणालाच भान राहिलं नव्हतं. एक निश्चयी आणि करारी खादीधारी तरुण आमच्यासमोर उभा होता. 'शाखानायक कोण आहे?' अशी गंभीर पृच्छा त्याने केली. बराच वेळ जागच्या जागीच चुळबुळून 'ती आज आलेली नाही' असं उत्तर कोणीतरी दिलं. दुसऱ्याच क्षणी शाखेचा ताबा या तरुणानं घेतला. उंचीप्रमाणे कतारीत उभं राहण्याचा खणखणीत आवाजात हुकूम आला. ओळ स्थिर होताच उंच मुलीकडून सुरुवात करून कतारीच्या समोरून सावकाश, शिस्तीनं पावलं टाकीत हा तरुण पुढे जात होता. माझा नंबर शेवटच्या तीन-चार मुलींमध्ये होता. माझ्यासमोर आल्यानंतर त्याने मला ओळीतून बाहेर येण्याची खूण केली. 'आपल्याला बहुधा शिक्षा सुनावण्यात येणार' अशी धाकधूक मनात वागवीत मी मुकाट्याने मान खाली घालून कतारीच्या समोर उभी होते. तेवढ्यात 'उद्यापासून ही मुलगी शाखानायकाचं काम

करील' अशी घोषणा कानावर पडली. 'मुली, तुझं नाव काय?' असा प्रश्न मला विचारला गेला तोही त्यानंतर. त्या संध्याकाळी ध्वज लावणे, शाखा चालवणे, ध्वज उतरवणे ही सारी कामं त्यांनीच माझ्याकडून करवून घेतली. 'थत्ते गुरुजी' अशी यदुनाथजींची ओळख अशी तिरंगी ध्वजाच्या साक्षीने झाली. चुकीतून शिक्षा किंवा क्षमा हे दोनच पर्याय तोपर्यंत अपेक्षित किंवा परिचित होते. चुकीतून शिक्षण देण्याची थत्ते गुरुजींची हातोटी आम्हाला सर्वांनाच त्या वेळी नवीन वाटली होती, थक्क करणारी होती.

''तोपर्यंत सेवादलासंबंधीची आमची कल्पना म्हणजे भरपूर खेळ, गप्पा, गोष्टी. या साऱ्या बाबी आम्हाला एका विशिष्ट दृष्टीतून शिकवल्या जात होत्या याचं भान नंतर आलं. अधूनमधून बौद्धिक वर्गासाठी थत्तेजी शाखेवर येत. त्यांच्या व्याख्यानातलं फारचं थोडं समजत असे. वक्तृत्वही फारसं प्रभावी नसे. पण या माणसाला काहीतरी भव्यदिव्य दिसलं आहे, तिथे जाण्याची वाट याला कळली आहे; त्या ध्येयानं याला झपाटून टाकलं आहे आणि आपल्याला तो त्या वाटेनं चालण्याची हिंमत आणि शक्ती देण्यासाठी काहीतरी वेगळे विचार सांगतो आहे एवढं जाणवायचं. कलापथकात म्हणण्यासाठी शिकवलेली गाणी तालासुरावर, मोकळ्या आवाजात, सामुदायिक पद्धतीने म्हणताना फार आनंद वाटायचा. पण हळूहळू त्या गाण्यांच्या अर्थाकडे लक्ष वेधू लागले. आनंदापलीकडे एक वेगळा आवेश आतून जाणवू लागला. 'परक्यांची सत्ता', 'जुलमी सरकार', 'पारतंत्र्य' या शब्दांतून हळूहळू अर्थांच्या संकल्पना मनात आकारू लागल्या. 'महात्मा गांधी', 'जवाहरलाल नेहरू', 'सुभाषबाबू' या नामोच्चारांना काही अद्‌भुत मंत्रशक्ती असल्याचा अनुभव येऊ लागला. 'करा पुकार... स्वातंत्र्याचा जयजयकार', 'जयहिंद जयहिंद पुकारो...', 'विजयी विश्व तिरंगा प्यारा, झंडा उंचा रहे हमारा', 'वेदमंत्राहून आम्हा वंद्य वंदेमातरम्' ही आणि अशी गाणी शे-दोनशेच्या समुदायापुढे म्हणताना मन थरारून जायला लागले. थत्ते गुरुजींना दिसलेली वाट आपल्यालाही खुणावू लागली आहे असा भास होई.

''मंतरलेले, तेजाळलेले ते दिवस जेव्हा जेव्हा स्मृतिपटलावर येतात तेव्हा तेव्हा थत्तेजींचे स्मरणही न चुकता होतेच. त्यांच्या प्रेरणादायी नेतृत्वातून जळगाव, धुळे, अंमळनेर, पाचोरे, एरंडोल, पारोळे इत्यादी नाना ठिकाणी तरुण मुले-मुली स्वातंत्र्यलढ्यासाठी स्वेच्छेने पुढे आली. अनेकांनी थत्तेजींप्रमाणेच त्या कार्याला आपले आयुष्य वाहिलेले मला ठाऊक आहे. त्यांनी अखेरपर्यंत यदुनाथजींना सच्ची

साथ दिली. यदुनाथजींनीही त्यांना कधी अंतर दिले नाही.''

अंमळनेरमध्येच राहणारे प्रख्यात साहित्यकार वा. रा. सोनार यदुनाथने त्यांना आणि इतर अनेकांना त्या काळात वेगवेगळ्या वेळी केलेल्या हार्दिक मदतीचे अनेक प्रसंग सांगतात.

सेवादलाच्या अनेक शाखा त्या वेळी गावोगाव होत्या. एकट्या अंमळनेरला दहा शाखा होत्या. तेथल्या त्रिकोणी ग्राउंडवर दर आठवड्याला सर्व शाखांचा मेळावा होत असे. या मेळाव्याला यदुनाथ न चुकता हजर राहात व सर्व सैनिकांना 'घाटी लेझिम' शिकवीत. शाखेवरची अवखळ पोरं कधी कधी त्या वेळी यदुनाथच्या किंचित हेल काढून बोलण्याची व घाटी लेझिम शिकवताना होणाऱ्या त्याच्या अंगविक्षेपाची नक्कलही करीत; पण यदुनाथवर त्याचा काहीही परिणाम होत नसे. जळगाव आणि नाशिक या दोन्ही जिल्ह्यांत यदुनाथने सेवादलाच्या विस्तारासाठी अपार परिश्रम केले.

आपटे गुरुजी आणि साने गुरुजींकडून यदुनाथला मिळालेली पहिली प्रेरणा या सेवादलाचीच होती. त्याचे पुढचे सर्व आयुष्य म्हणजे सेवादलात अंगीकृत केलेल्या तत्त्वांचा आणि मूल्यांचा विस्तार होता. आजही खानदेशात कुठे कुठे ती माणसे भेटतात ज्यांनी त्या वेळी यदुनाथला शाखांवर काम करताना, मुलामुलींना शिकवताना व गोष्टी सांगताना ऐकले, पाहिले होते. ती ज्या आत्मीयतेने, आदराने आणि भरभरून बोलत होती, त्यावरून त्यांच्यावर यदुनाथांच्या वागण्या-बोलण्याचा किती प्रभाव होता हे सहजी कळत होते.

यदुनाथांनी पुढे सेवादलाचे अध्यक्षपदही भूषविले. ते खऱ्या अर्थाने 'राष्ट्रसेवादल' व्हावे यासाठी सेवादलाची कार्यपद्धती आणि व्यवहाराची भाषा बदलण्याचा त्यांनी आटोकाट प्रयत्न केला. सेवादलाचे आजचे काम पुष्कळसे राष्ट्रभाषेत चालते त्याचे श्रेय यदुनाथांना आहे. साध्या बैठकीतली चर्चासुद्धा हिंदीतच व्हायला हवी असा त्यांचा आग्रह असे. आपल्या अध्यक्षीय काळात यदुनाथांनी सेवादलाविषयी जे जे लिहिले ते मुख्यत: हिंदीतच लिहिले. श्री. शामराव पटवर्धन यांची गुणवर्णनपर स्मरणिका निघाली तेव्हा बाकी साऱ्यांचे लेख त्या अंकात मराठीत होते. एकट्या यदुनाथांनी राष्ट्रसेवादलाच्या पंचसूत्रीबद्दलचा आपला विस्तृत लेख मात्र हिंदीतच लिहिला होता.

शाखांवर एकत्र येऊन तेच तेच खेळ खेळण्यापेक्षा ज्युडो, कराटे यांसारखे नवे काळानुरूप आवश्यक असणारे खेळ शाखांवर खेळले जावेत या विषयीही ते

आग्रही असत. सेवादल एका वर्तुळात न राहता सतत गतिमान व वर्धिष्णू राहावे यासाठी बौद्धिक, संघटनात्मक पातळीवर जे योजनाबद्ध प्रयत्न यदुनाथांनी केले, त्यामुळे सेवादल देशभर पोहचायला खूप मदत झाली. दुसरे, 'आंतरभारती'चे सर्व कार्यक्रम आपल्या काळात त्यांनी सेवादलाशी जोडून दिले होते. त्यामुळे सेवादल आणि 'आंतरभारती'चा प्रचार-प्रसार एकाच वेळी होत होता. सेवादल काळाबरोबर बदलावे पण त्यातून नवा भारतीय नागरिक घडत जावा यासाठी यदुनाथजींनी खूप परिश्रम केले. त्यामागेही एक अनुभव आहे. सेवादलाची स्थापना करणाऱ्या डॉ. ना. सु. हर्डिकर यांना त्यांच्या निधनाच्या काही दिवस आधीच यदुनाथ भेटले होते. त्या संबंधीची आठवण त्यांनी नंतर २६ ऑगस्ट १९७६ च्या दै. 'नवशक्ति'त लिहिली होती. डॉ. हर्डिकर यदुनाथांना सांगत होते. ''आम्ही ज्यासाठी लढलो ते हे नव्हे. आपल्याला आपल्या थोर वारशाची विस्मृती तर होत नाही ना, अशी शंका मला सतावत असते. मी आता वयपरत्वे दुबळा झालो आहे. पण मी तळमळत असतो. तरुणांनी तो उज्ज्वल वारसा जपण्यासाठी, विकसित करण्यासाठी श्रेष्ठ धारिष्ट्य दाखवले पाहिजे. आज स्थिती अशी आहे की आमच्या दृढ श्रद्धांनाही हादरे बसत आहेत. राष्ट्र बिकट अवस्थेतून वाटचाल करीत आहे. सेवादलाची सुदृढ चळवळ यावेळी पुष्कळच उपयोगी पडली असती, पण सेवादलाला त्याच्या योग्य स्थानावर कधीच येऊ दिले गेले नाही. माझे शब्द कठोर वाटतील पण त्यात कठोर वास्तवाचे प्रतिबिंब आहे.''

डॉ. हर्डिकर यांना एका अर्थाने वैफल्यग्रस्त अवस्थेत मृत्यू आला होता. त्यांचे ते वैफल्य व्यक्तिगत नव्हते. ते समाजाच्या पुनर्रचनेसाठी शेवटच्या श्वासापर्यंत लढणाऱ्या एका कृतार्थ जीवनाचे वैफल्य होते.

डॉ. हर्डिकरांच्या भेटीचा हा अनुभव यदुनाथजींच्या मनात खोल कुठेतरी घर करून गेला असावा. अध्यक्ष होते तोपर्यंत व नंतरही त्यांनी सातत्याने राष्ट्रसेवादल हे सर्व सत्तास्थानापासून मुक्त राहून एकात्म भारताच्या नवनिर्मितीचे हत्यार ठरावे यासाठी प्रचंड धडपड केली. एखाद्या संघटनेच्या बांधणीपेक्षा हे ध्येय कितीतरी पटींनें उच्चतर होते.

पुढे एक नामवंत पत्रकार म्हणून नावाजलेल्या यदुनाथांच्या पत्रकारितेचा प्रारंभही त्यांच्या बालपणातच झाला होता.

ते मॅट्रिकच्या वर्गात होते. 'लोकमान्य' दैनिकात त्या वेळी त्यांची छोटी बातमीपत्रे प्रकाशित होत. एकदा शाळेत नादारीच्या बाबतीत एका गरीब

विद्यार्थ्यावर अन्याय होऊन ती दुसऱ्याच कुणाला तरी देण्यात आली. ज्याला मिळाली तो धनवंताचा नातेवाईक होता. यदुनाथला हा अन्याय सहन झाला नाही. त्याने या घटनेचा सविस्तर वृत्तान्त 'लोकसत्ते'कडे पाठविला आणि तो जसाच्या तसा 'लोकसत्ते'त छापूनही आला.

वृत्तान्त वाचून सर्वत्र खळबळ उडाली. शाळेतले वातावरण तंग झाले. मुख्याध्यापकांना फारच राग आला. आपला राग त्यांनी विद्यार्थ्यांवर काढला. म्हणाले, 'लोकसत्तेच्या संपादकलाच पत्र लिहितो व विचारतो, कुणी हा उपद्व्याप केला म्हणून?'

यदुनाथला त्या गरीब विद्यार्थ्याची काळजी होती. त्याने पुन्हा संपादकांना पत्र लिहिले. श्री. पां. वा. गाडगीळ हे त्या वेळी संपादक होते. यदुनाथने कळवले, ''मी या शाळेतलाच विद्यार्थी आहे. जे कळवले ते खरे आहे. पण कृपया मुख्याध्यापकांना माझे नाव कळू देऊ नका.'' शेवटी त्या गरीब विद्यार्थ्यालाच ती स्कॉलरशिप मिळाली. यदुनाथसाठी हा एक साक्षात्कार होता. अन्यायनिवारणाची वृत्तपत्र ही एक मोठी शक्ती आहे याचा त्याला आलेला हा अनुभवच पुढे 'साधने'ची पत्रकारिता करताना उपयोगी पडला.

प्रत्यक्ष राजकारणात जाण्याचा विचार यदुनाथांच्या मनात कधीही नसावा. खानदेशात सेवादलाचे काम सुरू असतानाच गुरुजींनी बोलावले म्हणून ते मुंबईत दाखल झाले व पुढे 'साधने'ची पत्रकारिता हेच त्यांचे मुख्य जीवितकार्य ठरले.

## सेवाधर्माची दीक्षा

गुरुजींच्या सान्निध्यात आणि सेवादलाच्या संस्कारात यदुनाथांना एक विशिष्ट प्रकारची अलिप्तताही लाभली होती. त्यामुळे सत्ता, पैसा, पद, हेवेदावे, मत्सर, संस्था-संचालन वगैरेपासून ते सर्वथा अलिप्त राहात. कुठल्याही संस्थेचे कुठलेही पद त्यांनी कधी मागितले नाही किंवा त्याकरता कसलाही प्रयत्न केला नाही.

समाजवादी विचारसरणीशी असलेल्या त्यांच्या पक्क्या बांधिलकीचा पायासुद्धा याच वेळी रचला गेला. विशेषत: साने गुरुजींसोबत मुंबईच्या मेघा-भुवनमध्ये राहात असताना यदुनाथांच्या मनावर गुरुजींच्या एकूणच जीवनशैलीचा अमीट प्रभाव पडला. ''आपल्या आयुष्यात साने गुरुजींचा सेवाधर्म अल्प प्रमाणात तरी उतरावा, आपणही जीवनाची शुद्धता अनुभवावी, म्हणजे मनाला आल्हादकारक आणि जीवनाला सामर्थ्यदायक वाटल्याशिवाय राहणार नाही'' असे त्यांना प्रकर्षाने वाटे. गुरुजींच्या संपूर्ण नीतिमय व सेवाभावी आयुष्याच्या प्रकाशात त्यांची वाटचाल सुरू

झाली व समाजासाठी सर्वस्व देऊन टाकण्यानेच तिची समाप्ती झाली. कुठल्याही मोहाने यदुनाथांना पुढे ग्रासले नाही. याचे कारण त्या समर्पित सेवाभावी प्रवृत्तीत होते.

गुरुजींच्या सान्निध्यातच यदुनाथांना एका व्यापक राष्ट्रवादाची प्रेरणा मिळाली. या व्यापक राष्ट्रवादाच्या पायावरच गुरुजींची 'प्रांतभारती'ची संकल्पना उभी राहिली व पुढे तिने सारी मनुष्यजात कवेत घेणाऱ्या 'आंतरभारती'च्या संकल्पनेला जन्म दिला.

समाजात आमूलाग्र बदल करावयाचा असेल तर तो बुद्धीपेक्षाही भावसमृद्धतेने अधिक परिणामकारकपणे करता येईल असे गुरुजींना वाटे. त्यामुळे समाजातल्या सर्व थरांतल्या लोकांशी त्यांचे हार्दिक संबंध होते. या संबंधांना प्रत्यक्ष कृतीची जोड असल्यामुळे जेथे जेथे गुरुजी जात तेथे तेथे त्यांना जनतेचा प्रचंड पाठिंबा मिळे. त्यांच्या या अजातशत्रू व्यक्तिमत्त्वाचा यदुनाथांवर खूप प्रभाव पडला. 'साधने'च्या संपादकत्वाचे आपले कर्तव्य पार पाडताना ते असे म्हणून शकत की, 'माझ्याशी भांडणारा मनुष्य अजून जन्माला यायचा आहे.' ही निर्वैर वृत्ती गुरुजींकडून मिळालेली देणगी होती.

समाजवादासंबंधीचा शुष्क बौद्धिक काथ्याकूट यदुनाथांनी फारसा केलेला नाही. ज्या अर्थाने साने गुरुजींच्या मनात समाजवाद रुजला होता, त्याच अर्थाने यदुनाथांनीही नंतर समाजवादी विचारसरणीची पाठराखण केली. गुरुजी असे म्हणायचे की, ''समाजसत्तावाद म्हणजे वेदान्त. सर्वांना पोटभर अन्न मिळणे, अंगभर वस्त्र मिळणे, सर्वांना शिक्षण मिळणे, राहायला घर असणे म्हणजे समाजसत्तावाद.''

हे स्वप्न हातात कुठलीही सत्ता नसताना प्रत्यक्षात उतरवणे अर्थातच महाकर्मकठीण होते. तरी बुद्धीने गुरुजींनी हा निर्णय घेतला होता की ''सत्ताविरहित राहूनही समाजाची जी सेवा करायची त्या सेवेचे मूर्त स्वरूप समाजवादीच असेल.''

समाजातल्या तळागाळातल्या, अज्ञानी, दरिद्री, उपेक्षित लोकांच्या व्यथा-वेदनेला आणि कार्यकर्तृत्वाला जाणीवपूर्वक उजाळा देण्याचा जो उद्योग पुढे शेवटच्या श्वासापर्यंत यदुनाथांनी केला, त्याचे मूळ गुरुजींच्या या मान्यतेत होते.

मैत्री हे एक मूल्य म्हणून जपण्याचे संस्कार यदुनाथांवर सेवादलामुळेच झाले. अनेकांच्या आयुष्यात पुढे पुढे हे मूल्य हरवूनच जाते. पण यदुनाथांनी ते आयुष्यभर जपले. अडचणीत असलेल्या आपल्या मित्रांनाच नव्हे तर अगदी सामान्य

परिचितांनाही त्यांनी जमेल तशी व जमेल तेवढी मदत केली. यदुनाथांकडे फार पैसे कधीच नसायचे. किंबहुना अगदी कमीतकमी पैशांत, कमीतकमी गरजांच्या आधारे त्यांचा जीवनक्रम चाले. पण त्यातही काही काटकसर करून ते इतरांना मदत करीत.

श्री. वा. रा. सोनार काही दिवस नाशिकला 'गावकरी'त होते. काही कारणांनी त्यांची नोकरी सुटली. घरची परिस्थिती फारच नाजूक आणि अजिबात कामधंदा नाही. यामुळे त्यांना काही सुचेना. यदुनाथांनी त्यांना धीर दिला. आपल्या नावे आलेली आकाशवाणीची दोन कॉन्ट्रक्ट वा. रां.ना दिली व त्याचे पैसे त्यांना मिळतील याची व्यवस्थाही केली. ही व अशी कामे ते नित्यकर्मासारखी सहजपणे करीत. आपण काही विशेष करतो आहोत असे त्यांना वाटायचे नाही.

समाजवादी शिलाची ही पायभरणीसुद्धा याच काळात झाली. बालवयात त्यांच्या मनावर झालेला समतेचा, श्रमप्रतिष्ठेचा, प्रामाणिकपणाचा, सेवावृत्तीचा संस्कारच पुढे एका व्यापक सामाजिक सेवेत परिवर्तित झाला. यदुनाथांचे वैशिष्ट्य हे होते की संस्कारग्रहणाची ही प्रक्रिया बालवयात किंवा तारुण्यातच संपली नाही तर अगदी आयुष्याच्या शेवटापर्यंत सतत वर्धिष्णू होत राहिली. संस्काराचे सातत्य प्रत्येक वयात असेल तरच यदुनाथांसारखे निरामय, अहंकारमुक्त, सेवाभावी, जीवन जगता येते.

## अनासक्ती योग

प्रा. ग. प्र. प्रधान व यदुनाथ हे एकदा सपत्नीक हिमालयाच्या यात्रेला गेले होते. त्यांचा मुक्काम कौसानी येथल्या 'अनासक्ती आश्रमा'त होता. खूप मोकळा वेळ व अतिशय प्रसन्न वातावरणात या दोन्ही जिवलग मित्रांच्या अनेक विषयांवर मनमोकळ्या गप्पा होत. या गप्पांमध्येच एकदा यदुनाथांनी ज्याला खूप मदत केली होती अशा एका कुष्ठरोगी तरुण मित्राची आठवणही निघाली. यदुनाथांनी या तरुण मित्राला कुष्ठरोगाच्या प्राथमिक अवस्थेतून मुक्त होण्यासाठी आनंदवनाला पाठवले. त्यासाठी बाबांना पत्रं लिहिली. त्याच्या तिथल्या सर्व व्यवस्थेसाठीही खूप धडपड केली. सुदैवाने हा तरुण मित्र बरा झाला व पुढे मोठा कार्यकर्ताही बनला. प्रधानसरांनी त्याची आठवण करून यदुनाथांना सांगितले, ''तुमच्यामुळे त्याला नवे जीवन मिळाले, नवे बळ लाभले.'' यावर किंचित हसत यदुनाथांचे उत्तर होते, ''आपण अनासक्ती आश्रमात आहोत. काय केले आणि काय घडले याकडे अनासक्तीने पाहिले पाहिजे!''

आयुष्यभर यदुनाथांनी अनेकांना अनेक प्रकारे मदत केली पण त्या विषयी कधी कुणाकडे एका अक्षरानेसुद्धा उल्लेख केला नाही. मनाच्या मोठेपणाचा व अहंकार मुक्ततेचा हा वारसा गुरुजींकडून त्यांना मिळाला होता. या अनासक्तीने पुढे पुढे त्यांचे सर्व जीवनच व्यापून टाकले.

*

# ‘साधना’कार

अंमळनेरला असताना साने गुरुजी विद्यार्थ्यांच्या प्रबोधनासाठी एक छात्रालय दैनिक काढीत. ते अथपासून इतिपर्यंत त्यांनी स्वत:च लिहिलेले असे. १९३० साली ते बंद पडले. कारण गुरुजींइतक्या निष्ठेने तसे दैनिक चालवणारा दुसरा नंतर कुणीही मिळाला नाही. पुढे गुरुजींनी ‘काँग्रेस’ नावाचे साप्ताहिक सुरू केले. ‘काँग्रेस’च्या द्वारे ते विद्यार्थी, कामगार, शेतकरी यांच्यावर होणाऱ्या अन्यायाला वाचा फोडत असत. पण तेही फार काळ चालले नाही.

स्वातंत्र्यानंतर गुरुजींनी एक सायंदैनिक सुरू केले. ‘कर्तव्य’ हे त्याचे नाव. कालांतराने तेही बंद पडले. पण पुन्हा उमेदीने १५ ऑगस्ट १९४८ रोजी गुरुजींनी ‘साधना’ साप्ताहिक सुरू केले. आजही साने गुरुजींच्या विचारप्रकाशात ‘साधने’ची वाटचाल सुरू आहे. यदुनाथजी या वाटचालीतला एक मुख्य आणि महत्त्वाचा थांबा होते.

खरे तर गुरुजींनी दोन-पावणे दोन वर्षेच ‘साधना’ सांभाळली. नंतर रावसाहेब पटवर्धन, आचार्य जावडेकर यांच्या खांद्यावर ‘साधने’ची जबाबदारी पडली. यथाकाल मुंबईहून ‘साधने’चे कार्यालय पुण्यात आले. संयुक्त महाराष्ट्राबाबतची आपली भूमिका सहकाऱ्यांना अडचणीची ठरू नये म्हणून रावसाहेबांनी ‘साधना’ सोडली आणि सर्वार्थाने संपादनाची धुरा यदुनाथजींच्या खांद्यावर आली. तसे तर ते ‘साधने’च्या अगदी पहिल्या अंकापासून तत्संबंधी कार्याशी संबंधित होते. पण १९५७ पासून सर्वार्थाने यदुनाथजीच ‘साधना’ सांभाळीत. यदुनाथजींच्याच भाषेत सांगायचे तर ''वृत्तपत्रीय कागदाचे बांदे फूटपाथवर अंथरून आम्ही झोपत होतो.

सात रस्त्यावर राईस प्लेट खात होतो. प्रेसच्या मागच्या बाजूला सार्वजनिक संडास व नळ होता, तिथे आंघोळी करीत होतो."

## समर्थांचा वसा

वस्तुत: साने गुरुजी, आचार्य जावडेकर, आचार्य भागवत, रावसाहेब पटवर्धन, नानासाहेब गोरे ही समाजसेवा व पत्रकारितेतील फार मोठी व तेजस्वी परंपरा होती. यदुनाथजींनी या परंपरेचा वसा अत्यंत समर्थपणे पुढे चालवलाच; पण त्याच्या कक्षाही खूप विस्तारित केल्या.

प्रबोधन, रचना आणि संघर्ष ही नवसमाजाच्या घडणीची तीन प्रमुख साधने होत. यदुनाथजींनी या तिन्ही आघाड्यांवर संपादक व कार्यकर्ता या नात्याने फार उल्लेखनीय कार्य केले आहे. त्यांच्या प्रयत्नांमुळेच 'साधना' या तिन्ही साधनांची खरीखुरी वाहक बनली.

यदुनाथजी चळवळीतले कार्यकर्ते असले तरी त्यांचे वाचन आणि निरीक्षण फार सखोल व चौफेर होते. ते जे लिहीत ते अगदी नेमके, नेटके व एकटाकी असे. मी त्यांच्या लिखाणात खोडाखोड फारशी पाहिली नाही. पत्रकारितेच्या स्वरूपाप्रमाणे ही कलाही त्यांनी गुरुजींकडूनच आत्मसात केली होती.

गुरुजींच्या लिखाणात प्रेरणा आणि प्रबोधनाचे अनेक प्रवाह मिसळलेले असायचे. यदुनाथजींच्या लेखनातही ते होते. सनसनाटी, आक्रस्ताळे, आक्रमक, उद्धट, गैरलागू व वैयक्तिक कुचाळकीने भरलेल्या लेखनाचा स्पर्शसुद्धा या गुरु-शिष्यांच्या पत्रकारितेला नव्हता.

प्रखर विरोध करणारे अग्रलेख यदुनाथजींनी वेळप्रसंगी लिहिले आहेत पण त्यात कुणावरही वैयक्तिक आक्षेप किंवा कंबरेखालचे वार नाहीत. यदुनाथजी विनोबांचे, बाबा आमटे यांचे अगदी नि:सीम भक्त होते, पण वेळ आली तेव्हा या दोघांविरुद्धही त्यांनी फार परखडपणे लिहिले.

यदुनाथजी लोकसंग्राहक होते. जवळ जवळ देशभर त्यांच्या ओळखीची माणसे पसरलेली होती. 'साधने'च्या परिवारात त्यांच्यामुळे वेगवेगळ्या क्षेत्रांतली कितीतरी लहान-मोठी माणसे आली. या सर्वांकडून त्यांच्या त्यांच्या आवडीचे काम करून घेणे यदुनाथजींना सहजी जमत असे.

उत्कटता हा तारुण्याचा धर्म आहे; हे यदुनाथजी जाणत होते. सर्व थरांतल्या युवकांमध्ये त्यांचा सहज संचार असे. राष्ट्राची खरी संपत्ती ही तरुणाई. या तरुणाईला मातेच्या ममतेने व गुरूच्या कर्तव्यबुद्धीने त्यांनी जपले. त्यांच्या

संपादकीय कारकिर्दीतच 'साधना' सुजाण तरुणांमध्ये आवर्जून वाचले जाणारे साप्ताहिक झाले होते.

आजपर्यंत 'साधने'ची जवळपास दोन लाखांच्यावर पाने अनेक विषय, अनेक ग्रंथ आणि अनेक आंदोलनांच्या तरलस्पर्शी माहितीने काठोकाठ भरलेली आढळतील. या मार्गाची पायाभरणी यदुनाथजींनी केली.

त्यांच्या काळात निघालेल्या विशेषांकांची यादी पाहिली तरी थक्क व्हायला होते. समसामायिक असलेला एकही महत्त्वपूर्ण विषय यदुनाथजींच्या दृष्टीतून सुटलेला नाही. 'साधने'ची वाटचाल सतत काळानुरूप व प्रगतिशील राहिली ती त्यांच्या दक्षतेमुळे.

भारतीय स्वातंत्र्याच्या १५ व्या वर्षात यदुनाथांनी एक वैशिष्ट्यपूर्ण विशेषांक काढला. श्री. अनिल अवचट हे त्या अंकाचे विशेष संपादक होते. सगळा अंक अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या तरुणांनी लिहिलेल्या विलक्षण वास्तववादी पण स्फोटक लेखांनी भरलेला होता. याच अंकातल्या राजा ढाले यांच्या 'काळा स्वातंत्र्यदिन' या लेखामुळे सगळ्या महाराष्ट्रात प्रचंड वादळ माजले. यदुनाथजींविरुद्ध पुण्यात मोर्चे निघाले. 'साधना' कार्यालयासमोर त्यांचा पुतळा जाळण्यात आला. विरोधकांबरोबर स्वकीयांनीसुद्धा विरोधाच्या तोफा डागल्या. पण या सर्व गदारोळात ते कमालीचे शांत होते. या प्रकरणाच्या दरम्यान मी त्यांना अनेकदा भेटलो. ते अजिबात विचलित नव्हते. समाजाला रुचले, पचले नाही तरी चालेल पण वेळप्रसंगी जे पथ्यकर व उपकारक आहे ते पडेल ती किंमत देऊन सांगितलेच पाहिजे हा त्यांचा निर्धार होता.

## पुरोगामी विचारांची पेरणी

महाराष्ट्रात पुरोगामी विचारांच्या युवक-युवतींची एक फळी उभारण्याचे श्रेय यदुनाथांच्या या ठाम भूमिकेला द्यावे लागेल. ते आपल्या लेखनात सदैव युवकांची पाठराखण करताना दिसतात. त्यांच्यामुळेच समाजातल्या वेगवेगळ्या थरांतील युवक-युवतींना 'साधने'चे दरवाजे मोकळे झाले. त्यातल्या कितीतरी जणांना साहित्याच्या क्षेत्रात नंतर अत्यंत प्रतिष्ठेच्या जागा मिळाल्या. युवा जगताशी असा सर्वंकष व तरल संवाद साधणारा संपादक दुर्मीळच म्हणावा लागेल.

साने गुरुजींच्या 'आंतरभारती'च्या पूर्ततेसाठी 'साधना' आणि यदुनाथ यांनी अपरंपार धडपड केली. या दृष्टीने 'साधने'चे बाल विशेषांक पाहण्यासारखे आहेत. जवळपास २५ वर्षांपर्यंत 'साधने'ने कुमारांसाठी हे वार्षिकांक प्रकाशित केले.

महाराष्ट्रातल्या अगदी लहानसहान खेड्यातल्या शाळकरी मुलांचे लेखन व चित्रे 'साधने'च्या पानांवर झळकली. जवळपास प्रत्येक अंकात देश-विदेशातल्या मुलांना आवडणाऱ्या कथांचे अनुवाद असत. प्रत्येक अंकात साने गुरुजींची एक तरी कथा किंवा पत्र किंवा कुणा मान्यवरांचा गुरुजींवरचा लेख असे. याच संदर्भात बाल-कलाकारांच्या शिबिरांचा उपक्रमही राबविला जायचा. मुलांच्या सर्जनशीलतेला या शिबिरांमधून अनंत धुमारे फुटायचे. पुढे 'आंतरभारती'च्या बालशिबिरांमध्ये या उपक्रमाचे विशाल स्वरूप जनतेला पाहायला मिळायचे.

भारताच्या भिन्न भिन्न प्रांतातील भावजीवनाची ओळख व्हावी म्हणून त्या त्या प्रांतातील समृद्ध ललित साहित्याचा – विशेषत: कथा-कविता – अनुवाद प्रत्येक दिवाळी अंकामधून यदुनाथांनी सादर केला. आजसुद्धा ही परंपरा अक्षुण्ण आहे. हे बाह्यत: सोपे वाटणारे काम कमालीचे बिकट असते याचा अनुभव जे या मार्गाचे प्रवासी आहेत त्यांनाच येईल. त्या त्या भाषेतील कथा-कवितांना न्याय देणारे योग्य अनुवादक शोधण्यात यदुनाथजी पारंगत होते. ते स्वत: ४-५ भाषा उत्तमपणे जाणत. त्यामुळे अनुवादातल्या त्रुटींवरही ते नेमके बोट ठेवू शकत.

## चळवळीचे विश्वसनीय मुखपत्र

'साधने'च्या या उपक्रमामुळे प्रांताप्रांतातले स्नेह, सौहार्द्र व समज निश्चितपणे वाढीला लागली आहे. 'साधना' चळवळींचे विश्वसनीय मुखपत्र होते. समाजप्रबोधनात्मक ज्या चळवळी यदुनाथांच्या कार्यकालात झाल्या त्या सर्वांची यथायोग्य नोंद तर घेतली गेलीच, शिवाय अनेक चळवळींचा अगदी शेवटपर्यंत पाठपुरावाही केला गेला. संयुक्त महाराष्ट्र, गोवा मुक्तिआंदोलन, एक गाव-एक पाणवठा, बालबोध-पाठ, मुस्लीम सत्यशोधक मंडळाचे उपक्रम, आनंदवन, बाबा आमटेंचे कार्य, 'आंतरभारती'च्या व 'सोमनाथ'च्या श्रमसंस्कार छावण्या, भमरागडचा लोकबिरादरी प्रकल्प, भारत जोडो यात्रा इत्यादी अनेक बाबींना 'साधने'तून प्रथमत: सविस्तर प्रसिद्धी मिळाली.

प्रा. नरहर कुरुंदकर, हमीद दलवाई, बाबा आमटे, बाबा आढाव, रज़िया पटेल, शरणकुमार लिंबाळे इत्यादींचे कार्य यदुनाथजींमुळे सगळ्या महाराष्ट्राला व महाराष्ट्राबाहेरसुद्धा ज्ञात झाले. अगदी लहानशा गावातल्या समाजोपयोगी उपक्रमाचीसुद्धा जाणीवपूर्वक दखल ते घेत. त्यामुळे 'साधने'ची पत्रकारितेच्या क्षेत्रात दुहेरी भूमिका होती. ते एक विचारपत्र तर होतेच पण सर्व प्रगतिशील चळवळीचे व्यासपीठही होते. कुठलेही बाजारू यश यदुनाथांना व 'साधने'ला

मिळवायचे नव्हते. त्यामुळे आपल्या रंगरूपात व ध्येयधोरणात ती सतत काही मूल्यांना चिटकून राहिली आणि ही मूल्ये मुख्यत: समाजवादी समाजरचनेची होती.

## व्यक्तिचित्रणाचा कोश!

संपादकीयांव्यतिरिक्त यदुनाथ 'साधने'त अनेक टोपणनावाने लिहीत. 'मुल्कपरस्त', 'मुसाफिर', 'सोमाजी गोमाजी कापसे', 'प्रतिक्रिया', 'खुशालजी चौधरी' या आणि कधी कधी नाव न देता वेगवेगळ्या विषयांवर वेगवेगळ्या ठिकाणी लिहीत. या लिखाणात महाराष्ट्रातल्या व महाराष्ट्राबाहेरच्यासुद्धा अनेक कार्यकर्त्यांचा मोठा हार्दिक परिचय असायचा. 'साधना म्हणजे व्यक्तिचित्रणाचा कोश' असे एक मत गमतीने व्यक्त केले जायचे. एकार्थाने ते खरे होते. पण हा कोश तयार करण्यामागे यदुनाथजींचे अपार परिश्रम होते. ते जे लिहीत त्याला प्रत्यक्ष अनुभवाचा स्पर्श असे. महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेर त्यांच्याइतका निरंतर फिरस्ती करणारा दुसरा कुणी संपादक असेल असे मला वाटत नाही. व्यक्ती, संस्था, उपक्रम, ग्रंथ, सभा-संमेलने, चर्चासत्रे, मोर्चे, आंदोलने, यात्रा इत्यादी अनेक बाबींविषयी त्यांचे साक्षेपी लिखाण असे.

सर्व साप्ताहिक किंवा वृत्तपत्रसुद्धा एकहाती लिहिण्याची किंवा सजवण्याची जी अद्भुत लेखनक्षमता यदुनाथजींच्या पिढीत होती ती नंतर जवळ जवळ अदृश्यच झालेली दिसते.

'साधना' केवळ उपभोक्त्यांसाठी 'तयार' केलेले साप्ताहिक नाही, याची स्वच्छ जाणीव यदुनाथजींना होती. पत्रकारितेत ज्या वेळी सनसनाटीकरण व विकृतीकरणाचा पडघम वाजत होता त्या वेळीही 'साधने'ने वास्तव कथनाची मर्यादासंपन्न वाट सोडली नाही. वेळप्रसंगी त्यांची भाषा कडक व्हायची पण एरव्ही ते सोप्या, साध्या व विलक्षण तथ्यपूर्ण भाषेत लिहायचे. लिखाणात वस्तुनिष्ठतेला प्राधान्य असल्यामुळे भाषेचा बडेजाव असण्याचे काही कारण नव्हते.

## अनामता आणि एकरूपता

'साधने'ने अनामता आणि एकरूपतेचे (युनिफॉर्मिटीचे) फार कसोशीने पालन केले. संपादकासहित अन्य कुणाच्याही पूर्वग्रहाला 'साधने'त प्राधान्य नसायचे. विश्वासार्हता हेच पत्रकारितेचे सर्वोच्च मूल्य असते. त्याचे अगदी कमाल निष्ठेने पालन केल्यामुळे कुठल्याही व्यक्तीचा अनावश्यक उदो उदो 'साधने'ने केला नाही. एक संपादक म्हणून स्वत:चा गौरव करणारी पत्रे बहुतांशी यदुनाथजी छापत नसत. संपादकीयवरसुद्धा कधीही संपादकाचे नाव नसायचे. आजही ती परंपरा

अक्षुण्ण आहे.

## आगरकरी सुधारकवृत्ती

यदुनाथजींमधला संपादक हा एक कर्ता सुधारकही होता. सर्व सामाजिक सुधारणांना त्यांचा केवळ शाब्दिक पाठिंबा नसे तर ते आपल्या लेखणी व विचारांसोबत संपूर्ण शक्तीनिशी अशा सुधारणांच्या मागे उभे राहात. सुप्रसिद्ध लेखक शरणकुमार लिंबाळे यांच्या 'अक्करमाशी' या आत्मचरित्रामुळे अनैतिक संबंधातून जन्माला आलेल्या मुलांचे कितीतरी प्रश्न समाजापुढे आले. यदुनाथजींनी लिंबाळे यांना सर्वतोपरी मदत केली. अशा मुलांना आपल्या पित्याच्या संपत्तीतला वाटा मिळावा या संबंधी कुठलाही कायदा नव्हता. यदुनाथजींनी या प्रश्नातही लक्ष घातले. रज़िया पटेलला त्यांनी लिहिलेल्या पत्रातून मुस्लीम समाज व स्त्रिया यांसंबंधीच्या अनेक प्रश्नांची मूलगामी चर्चा झाली. लता काळे-शेख या आंतरधर्मीय विवाहाचे त्यांनी खुले समर्थन केले, खूप गदारोळ उठला. राजा ढालेचा लेख छापला त्या वेळी तर त्यांची 'अंत्ययात्रा'च विरोधकांनी काढली. पण सुधारक यदुनाथ अशा कुठल्याही दबावापुढे किंचितही नमले नाहीत. पत्रकारितेतली त्यांची 'आगरकरी सुधारकवृत्ती' सतत सतेज राहिली.

नामांतर आंदोलन चालू होते त्या वेळी यदुनाथजी 'मराठवाडा' दैनिकाचे संपादन करीत होते. ते पक्के नामांतरवादी तर मराठवाडाचे प्रमुख अनंतराव भालेराव प्रखर विरोधी. दोन्ही मित्रांच्या मैत्रीत यामुळे अंतर पडले नाही. पण दोघेही आपआपल्या भूमिकेला ठामपणे चिटकून होते.

## स्पष्ट आणि परखड

ते जेव्हा केव्हा एखाद्या सामाजिक प्रश्नावर लिहीत तेव्हा रोकठोक लिहीत, जर-तरची भाषा नसे. प्रश्न कितीही वादग्रस्त असो. पडेल ती किंमत देऊन त्याविषयी परखड स्पष्ट लिहिणे त्यांना भावत असे. दलित पँथर, नर्मदा आंदोलन, नामांतर, दलितांचे धर्मांतर इत्यादी कितीतरी प्रश्न असे होते, ज्या विषयी त्यांची भूमिका सत्यकथनाची पण विधायक होती. अशा वेळी ते अनेकदा जनमताविरुद्ध जाऊनही आपले म्हणणे मांडायला कचरत नसत. काही व्यक्ती, काही समाज, काही चळवळी त्यामुळे दुखावल्याही गेल्या. पण यदुनाथजींनी आपले व्रत सोडले नाही. मात्र साने गुरुजींचा एक विचार त्यांच्या मनात पूर्णपणे ठसला होता. 'मतभिन्नता असावी पण सुजनताही असावी.' एक संपादक म्हणून ही सुजनता वाढवण्याचा अगदी आटोकाट प्रयत्न यदुनाथजींनी केला. 'साधना' हे एक

विचारपत्र आहे पण ते एकारलेले, संकुचित ध्येयाचा पाठपुरावा करणारे, आग्रही, आक्रमक विचारपत्र नव्हते. तिच्या विचाराची पातळी सदैव उच्च राहिली. विवेक आणि संयमाची वाट त्या साप्ताहिकाने कधीही सोडली नाही. सर्वांत वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट ही होती की ही वैचारिकता कोणत्याही मूठभर लोकांसाठी नव्हती. ती या देशातल्या गोरगरीब जनतेच्या व दबलेल्या, पिडलेल्या समाजघटकांचा विचार प्रामुख्याने करणारी होती. सामान्यांचे जीवन सुधारण्याचा जो निरंतर प्रयत्न यदुनाथजींच्या या पत्रकारितेने केला त्याला आधुनिक पत्रकारितेच्या इतिहासात खरोखर तोड नाही.

या गरीब जनतेला नागवणाऱ्या वर्गवाद, वर्णवाद व जातिवादाविरुद्ध 'साधने'ने निरंतर संघर्षाचे निशाण फडकत ठेवले. विचारांचा वन्ही 'साधने'तून सतत पेटता ठेवणे त्यांना जमले; कारण त्यांच्या स्वत:चा जीवनपट याच विचारांच्या उभ्या-आडव्या धाग्यांनी घट्टपणे विणला गेला होता.

आपल्या 'हंस' मासिकातून असा लढा उत्तर प्रदेशात प्रेमचंदांनीही दिला होता. उत्तर भारतात प्रेमचंद जन्मशताब्दी सुरू होती त्या वेळी महाराष्ट्रात सर्वत्र सामसूम होती. यदुनाथजींचे पत्र आले. 'प्रेमचंदवर 'साधने'चा एक विशेषांक काढायचा आहे. तू त्याचं संपादन कर. लेखकांना पत्रं लिही. लेख मागव.' महाराष्ट्रात 'साधना' हे पहिले मराठी साप्ताहिक होते, ज्याचा 'प्रेमचंद विशेषांक' प्रकाशित झाला होता. 'साधने'चे जुने अंक चाळले तरी हे सहज लक्षात येते की त्यात विविध भाषांमधल्या त्या त्या साहित्यकारांना अग्रस्थान देण्यात आले आहे – ज्यांचे जीवन आणि लेखन हे समाजोत्थानासाठी समर्पित होते. यदुनाथ साहित्याकडे केवळ एक कला म्हणून पाहात नव्हते. त्याची जीवनाशी बांधिलकी असलीच पाहिजे असा त्यांचा आग्रह होता. 'साधने'तून त्या साहित्याला अग्रक्रमाने प्रसिद्धी मिळाली जे समाजजीवनाच्या सुखदु:खाशी समरस होते.

यात एक महत्त्वाची मेख अशी होती की आपल्या कुठल्याही पुस्तकाचे परीक्षण यदुनाथांनी 'साधने'त छापले नाही. त्यांनी 'साधने'बाहेर प्रकाशित केलेल्या पुस्तकाच्या जाहिरातीही 'साधने'त फारशा नसत. आपणच आपली काय टिमकी मिरवून घ्यायची, हा विचार त्यामागे असायचा. इंटरव्ह्यू घेणे आणि व्यवस्थित संकलित करून ते छापणे ही एक कला असते. हिंदी पत्रकारितेत असे उत्तम इंटरव्ह्यू श्री. कन्हैयालाल मिश्र 'प्रभाकर' यांनी घेतले आहेत. मराठी पत्रकारितेत तसेच इंटरव्ह्यू यदुनाथजींनीही घेतले. अनेक घटना-प्रसंगाचे त्यांनी केलेले

रिपोर्टिंगही वैशिष्ट्यपूर्ण असायचे. नावाचा व अन्य फापटपसारा बाजूला सारून ते घटनेतले नेमके तथ्य तेवढे नोंदवायचे. दाद देता येणाऱ्या जागांवर दाद मिळायची पण चुका असतील तेथे त्या चुकांचाही सौम्य भाषेत निर्देश असायचा.

## आणीबाणीविरुद्ध अभूतपूर्व लढा

पत्रकारितेच्या स्वातंत्र्यासाठी 'साधने'तून यदुनाथजींनी दिलेला लढा केवळ अभूतपूर्व आहे. इंदिराजींनी लादलेल्या आणीबाणीचा 'साधने'ने अगदी खुला व नि:संदिग्ध विरोध केला. 'साधना' समाजसेवेला समर्पित होती, पण सौजन्य, समर्पण आणि नैतिकता म्हणजे सत्तेपुढे मान तुकवणे किंवा लाचारी पत्करणे नव्हे. १९४२ साली गांधीजींनी 'भारत छोडो' चळवळीच्या वेळी लिहिले होते, ''वृत्तपत्रे दबावाखाली चालविण्याऐवजी ती बंद केलेली बरी. याबरोबरच मी हेही सांगू इच्छितो की ज्या ज्या वेळी त्यांचा विवेक व अंतरात्मा 'विद्रोह' करील त्या त्या वेळी त्यांनी त्या मताचे समर्थन करावे.''

आणीबाणीचा विचार 'साधने'ला मानवण्यासारखा नव्हताच. तो जसा वृत्तपत्र स्वातंत्र्यावर घाला होता तसाच तो लोकशाहीवरसुद्धा घाला होता आणि हा घाला पडत असताना हात चोळीत स्वस्थ बसून राहणाऱ्यांपैकी यदुनाथजी नव्हते. आणीबाणी जाहीर झाली त्या दिवशी ते कुलाबा जिल्ह्यातल्या रोहे गावी होते. त्यांच्या व्याख्यानाचा विषय होता, 'समान नागरी कायदा'. त्या व्याख्यानातच यदुनाथजींनी निर्भयपणे आणीबाणी लादल्याबद्दल तीव्र नापसंती व्यक्त केली.

'साधने'त श्री. एस. एम. जोशी, श्री. अच्युतराव पटवर्धन व यदुनाथांची आणीबाणीविषयीच्या भूमिकेसंबंधी एक बैठक झाली. 'हाराकिरी करण्याची पाळी आली तरी बेहत्तर पण शरण जायचं नाही' ही यदुनाथांची भूमिका होती. पण अनुभवी अच्युतरावांचा सल्ला अधिक मोलाचा ठरला. 'जे घडते आहे त्याचा प्रतिकार केला पाहिजे. पण हाराकिरी करायची नाही. सौम्यतम पातळीवर प्रतिकार सुरू करा. आधी सौम्यतर, मग सौम्य व शेवटी प्रखर करा. काहीही झाले तरी निषेध नोंदवायचाच पण लढा बराच काळ लढावा लागेल याचेही भान ठेवायचे.'

'साधने'चे विश्वस्त हे काही केवळ तिथल्या मालमत्तेचे विश्वस्त नव्हते, ते एका ध्येयवादाचेही विश्वस्त होते. त्या ध्येयाचा रक्षणासाठी निर्धाराने संघर्ष करण्याचा विडा यदुनाथांनी उचलला. देशातली जवळ जवळ सर्व मोठी वृत्तपत्रे आणीबाणीला शरण गेली होती. एरव्ही ब्रिटिश सरकारला निर्भयपणे 'सरकारचे डोके ठिकाणावर आहे काय?' असे ठणकातून विचारणाऱ्या सिंहानेसुद्धा मान तुकवून आणीबाणीचा

जुलूम सहन केला. महाराष्ट्रात अत्यंत निर्भयपणे उभी राहिली यदुनाथजींची 'साधना' व गुजरातेत चुनीभाई वैद्यांचा गुजराती 'भूमिपुत्र'. आणीबाणीविरुद्ध 'साधने'चा पहिला अंक म्हटलं तर अगदी साधा होता. पाने एकूण चार. पहिल्या पानावर एक काळा ब्लॉक, आतल्या पानावर साने गुरुजींचे रेखाचित्र व त्यांचा शेवटचा संदेश, शेवटच्या पानावर मजकूर! बस्स! पण एवढेसुद्धा अन्य वृत्तपत्रांनी केले नव्हते.

पुढच्या अंकाची पाने वाढली. त्यात १९६३ च्या जुलैत विनोबांनी बंगालमध्ये केलेल्या एका भाषणातील उद्धरण होते. 'शिस्तीचे लगाम लावून तोंडे बंद करण्यात लोकशाही नसून प्रत्येकाने आपल्या मनातील बात मोकळेपणी बोलण्यात लोकशाही आहे' या वाक्याने सुरू होणारे हे उद्धरण समजेल त्याला बरेच बोचणारे होते.

### सौम्यतम ते प्रखरतम

'साधने'चा प्रतिकार असा सौम्यतमापासून प्रखरतेपर्यंत वाटचाल करीत गेला. एकूण १३ अंक जप्त करण्यात आले. प्रत्येक अंकावर जप्ती यायची पण अंक निघायचा व लोकांपर्यंत पोहचायचासुद्धा! सरकारने जामीन मागितला. 'साधने'ने तो नाकारला. जनतेने जामीनकीचे पैसे भरले. शेवटी प्रेसला टाळे ठोकण्यात आले! 'साधने'वर बंदी लादण्यात आली. तर यदुनाथांनी 'कर्तव्य'चे अंक सुरू केले. दरम्यान पु.लं.नी. अनुवाद केलेली जे.पीं.ची डायरीही छापली. ती 'साधने'तूनच छापली गेली.

६ जूनला मुंबईच्या पत्रकार संघात त्यांचे व्याख्यान ठरले होते. ऐनवेळी संयोजकांनी ते रद्द केले. यदुनाथजींचे म्हणणे होते की, भाषण होत नसेल तर आपण पत्रकार हात पाठीमागे बांधून या मैदानाला एक फेरी मारू. पत्रकार म्हणून आपला विरोध जनतेसमोर आला पाहिजे. पण तेही संयोजकांनी होऊ दिले नाही.

यदुनाथजींनी नंतर आपले पूर्ण भाषण 'साधने'तून प्रसिद्ध केले. त्यांची एकाकी लढत चक्रव्यूहातल्या अभिमन्यूच्या झुंजारवृत्तीची आठवण करून देत होती. त्या काळात त्यांच्या सगळ्या कार्याची एकच दिशा होती – वृत्तपत्र स्वातंत्र्यावर लादल्या गेलेल्या अमानुष बंधनांचा विरोध! त्याकरिता त्यांनी वाणी आणि लेखणीचा जास्तीतजास्त वापर केला. 'महाराष्ट्र टाइम्स', 'लोकसत्ता', 'नवशक्ति', 'सकाळ' इत्यादी महाराष्ट्रातल्या मोठ्या दैनिकांमधून व इंदौरच्या 'सर्वोदय प्रेस सर्विस'सारख्या वृत्तसंस्थेमार्फत उत्तर प्रदेश, मध्य प्रदेश, राजस्थान, पंजाबपर्यंतच्या अनेक लहान-मोठ्या वृत्तपत्रांतून यदुनाथजींनी हा जागर सुरू ठेवला.

प्रख्यात पत्रकार श्री. पां. वा. गाडगीळ यांनी 'लोकसत्ते'त इंदिराजींच्या भूमिकेचे समर्थन करणारे सात लेख लिहिले. त्याला उत्तर म्हणून तसेच सात लेख लिहिण्याची इच्छा यदुनाथजींनी तत्कालीन संपादकांना कळविली. त्यातला पहिलाच लेख इतका सेन्सॉर केला गेला की पुढचे लेख देण्यात काही अर्थच नव्हता!!

नागपूरच्या 'मासेस'ने काही लेख छापले पण पुढे सरकारी दडपशाहीमुळे तेही नमले. या काळात यदुनाथजींची भ्रमंतीही सतत सुरू असायची. व्याख्यानाचा विषय कुठलाही असो, आणीबाणीच्या दडपशाहीचा विरोध त्यात असायचाच. त्यांच्या भाषणात कुठलीही आक्रस्ताळी विधाने, गर्जना, घोषणा नसत. पण वेगवेगळी उदाहरणे, उद्धरणे आणि अनुभव यांच्या साहाय्याने ते विषयाची अशी मांडणी करीत ज्यामुळे श्रोता अंतर्मुख व्हावा.

त्या काळात राष्ट्रीय सेवा योजनांच्या सर्व मोठ्या केंद्रांवर यदुनाथजींची भाषणे झाली होती. इकडे सरकार एकामागून एक 'साधने'चे अंक आक्षेपार्ह म्हणून घोषित करीत होते. तर दुसऱ्या बाजूला प्रत्येक बंदीगणिक 'साधने'ची लोकप्रियता वाढत होती. बंदी लादला गेलेला प्रत्येक अंक अत्यंत दर्जेदार साहित्याने ठासून भरलेला असे. एकही वेडावाकडा शब्द न लिहिता 'साधना' जनतेतील स्वातंत्र्याची आकांक्षा धगधगत ठेवण्याचे काम करीत होती. त्यात एस. एम. जोशी, नानासाहेब गोरे, मोहन धारिया, जॉर्ज फर्नांडिस, पुरुषोत्तम मावळंकर, खासदार कृष्णकांत, न्या. छगला, कवी उमाशंकर जोशी इत्यादींच्या अत्यंत परखड मुलाखती होत्या. तर टिळक, आगरकर, फुले, आंबेडकर ते विनोबा-जयप्रकाशजींपर्यंत अनेकांनी वेळोवेळी केलेली 'स्वातंत्र्य' व 'लोकशाही'संबंधीची ऐतिहासिक वक्तव्येही होती.

तुरुंगात डांबल्या गेलेल्या राजबंद्यांसंबंधीच्या सत्यकथा 'साधने'तून प्रथमत: बाहेर आल्या. जयप्रकाशजींशी सरकारने केलेले अमानुष वर्तन, श्रीमती मृणाल गोरे यांचा अकोले तुरुंगातील छळवाद, प्रभाकर शर्मा यांचे आत्मदहन यांसारख्या कितीतरी घटना केवळ 'साधने'मुळे वाचकांना कळत होत्या. ज्या वेळेला सारी वृत्तपत्र सृष्टी आळीमिळी साधून चिडीचूप बसली होती त्या वेळी केवळ 'साधने'तून सत्यकथनाचे हे निर्भय प्रयोग बिनदिक्कतपणे सुरू होते.

यदुनाथांना दम्याचा विकार होताच. पण या काळात ऊन, पाऊस, थंडी यांना न जुमानता त्यांचे फिरणे सुरू असे. त्याचे व्हायचे ते परिणाम त्यांच्या प्रकृतीवर होतच असत.

वृत्तपत्र स्वातंत्र्यासाठी आपण जे काय करतो आहोत ते देशभर पोहचायला

हवे, किमान त्यामुळे काही संपादक, काही वृत्तपत्रांना तरी प्रेरणा मिळेल असे त्यांना वाटे. याबाबतीत त्यांना खरीखुरी साथ दिली इंदौरच्या 'सर्वोदय विचार समाचार सेवे'च्या महेंद्रभाईंनी. अगदी साधेसुदे व गबाळेपणात जमा होणारे कपडे घालणारे व काहीसे तसेच दिसणारे महेंद्रभाई अत्यंत धाडसी, प्रखर, ध्येयवादी व सच्चे सर्वोदयी कार्यकर्ते होते. त्यांच्या 'समाचार सेवे'कडे जे लेख येत ते देशातील किमान शे-दीडशे वृत्तपत्रे तरी छापत असत.

यदुनाथजींनी महेंद्रभाईंकडे हिंदीतून लेख पाठवायला सुरुवात केली. प्रचलित एकाधिकारशाही किती घातक व घृणास्पद आहे हे या लेखांमध्ये स्पष्टपणे सूचित केलेले असे. शंभर-सव्वाशे लहानमोठी वृत्तपत्रे ते छापत. त्यामुळे देशभर जागृतीचे एक वातावरण निर्माण होत होते. 'नवभारत टाइम्स'पासून छोट्या जिल्ह्यापत्रापर्यंत हे लेख आले. उत्तर प्रदेश, मध्यप्रदेश, राजस्थान, हरियाणात मोठ्या प्रमाणावर या लेखांची चर्चा होत असे. तुरुंगात असलेले राजकैदीही ते वाचीत व तत्संबंधी यदुनाथजींना पत्रे लिहीत.

शेवटी महेंद्रभाईंनाही अटक झाली. त्यांनी 'भूमिपुत्र'संबंधित न्यायालयाचा निवाडा सेन्सॉर बोर्डला न जुमानता छापला होता.

तुरुंगात राजबंद्यांचा छळ केला जात असे. त्यांच्या परिवारांचेही हाल होत. थोडीफार मदत जवळपासचे लोक करीत पण ती अपुरी असे. 'साधने'ने असे ठरवले की जाहीरपणेच लोकांकडून या कामासाठी मदत मागायची. एक परिपत्रक आचार्य दादा धर्माधिकारी, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, केदारनाथजी, वि. प्र. लिमये, गोविंदराव जोशी व एस. एम. जोशी यांच्या सहीने निघाले. अनेक मराठी वृत्तपत्रांना ते पाठविण्यात आले. कुणीही छापले नाही! 'साधने'ने रीसतर पावत्या वगैरे छापून हजारो रुपयांचा निधी गोळा केला व राजबंद्यांच्या घरापर्यंत पोहचताही केला.

विनोबांचे मत असे होते की, राजबंद्यांना व त्यांच्या परिवारांना मदत करण्याचे हे काम सरकारचे आहे. सरकारला ते करू द्यावे, तसे त्यांनी इंदिराजींना व शंकरराव चव्हाणांना सुचवलेही होते. पण यदुनाथजींचा विचार वेगळा होता. राजबंद्यांची लढाई सर्व जनतेतर्फे जनतेच्या स्वातंत्र्यासाठी चालली होती. या संघर्षात जनतेचाही सहभाग असायला हवा होता. तो देणे हे जनतेचे कर्तव्यच होते. सरकारवर सतत का अवलंबून राहावे? स्वबळावर काही निर्णय का घेऊ नयेत? यदुनाथ व विनोबांचा या दीर्घ चर्चेचा सारांश वृत्तपत्रातून प्रकट करू द्यावा या यदुनाथजींच्या विनंतीचाही विनोबांनी इन्कार केला.

यदुनाथजींच्या लेखी हे सगळे फार कष्टदायक होते. या काळात विनोबांशी उघड उघड मतभेद व्यक्त करणाऱ्या अगदी मोजक्या लोकांपैकी ते एक होते. एकीकडे त्यांची विनोबांवर श्रद्धा होती तर दुसरीकडे त्यांचे लोकशाहीवर प्रेम होते; वृत्तपत्र स्वातंत्र्याविषयी तळमळ होती. शेवटपर्यंत यातल्या दुसऱ्या गोष्टीचे पारडे जड राहिले.

'साधने'चे एका वर्षातले एकूण एक अंक जप्त झाले. वृत्तपत्रांच्या इतिहासातला हा उच्चांक होता. केवळ 'साधने'चे प्रकाशन एवढाच यदुनाथांचा उद्देश नव्हता. 'जनबोध प्रकाशना'सारख्या वेगवेगळ्या प्रकाशन संस्था व वेगवेगळे प्रकाशक गाठून त्यांनी कित्येक पुस्तके प्रकाशित केली. जयप्रकाशजींची डायरी जवाहर कोटेचाने 'अभय प्रकाशना'तर्फे प्रकाशित केली. मधुवाणींनी 'कर्तव्य' सुरू केले. पुरुषोत्तम मावळंकर यांचे गुजरातीतील लोकशाहीविषयक पुस्तक 'जनबोध'तर्फे प्रकाशित झाले. 'अभय प्रकाशना'तर्फे पुढे अनेक लहान-मोठी पुस्तके प्रकाशित झाली. ही सर्व मंडळी 'साधने'चीच होती. केवळ महाराष्ट्रातच नव्हे तर सगळ्या देशभर 'साधने'ने जनप्रबोधनाचे हे कार्य अखंडितपणे चालू ठेवले आणि देशभर 'साधने'ला या कामाचे समर्थकही मिळत गेले. एका बाजूला सरकार दरबारी 'साधने'वर खटले चालूच होते. सरकारला हे सिद्ध करणे कठीण जात होते की मुखपृष्ठावर काळा ब्लॉक छापणे, गांधी-विनोबांची भारताच्या स्वातंत्र्य-संग्रामातील वक्तव्ये छापणे, जनतेला लोकशाही मूल्यांचे शिक्षण देणे, यात सरकारविरोधी विध्वंसक, हिंसा माजवणारे असे काय होते? शेवटी उच्च न्यायालयात 'साधने'ने हा खटला जिंकला. जप्त करण्यात आलेला जामीन सरकारला परत करावा लागला. वकिलाचा खर्च देणे भाग पडले ते वेगळेच. ही सर्व हकिकत 'साधना व्हिंडिकेटेड' या इंग्रजी ग्रंथात प्रकाशित करण्यात आली. यदुनाथजींनी आणीबाणीत दिलेल्या लढ्याची कथा तसे पाहिले तर फार दीर्घ आहे. हा काळ त्यांच्या आयुष्यातला एक सर्वोत्तम काळ होता. स्वातंत्र्याच्या लढाईत ते ज्या निष्ठेने आणि तन्मयतेने लढले त्यापेक्षा कैक पटीने अधिक तीव्रतेने व एकाग्रपणे ते आणीबाणीविरुद्धच्या संघर्षात लढले. त्यांच्या पत्रकारितेला या काळात जणू अनंत धुमारे फुटले. कुणाचेही दडपण – अगदी विनोबांचेसुद्धा – त्यांना कधी विचलित करू शकले नाही. वाणी आणि लेखणीच्या क्षेत्रांतले त्यांचे कर्तृत्व जणू सर्वांगाने बहरून आले होते.

विनोबा यदुनाथजींचे श्रद्धास्थान होते. पण त्यांची आणीबाणीतली भूमिका व

मौनमुक्तीनंतर जयप्रकाशजींविषयी एकही शब्द न उच्चारणे यदुनाथांना फार बेचैन करणारे ठरले. पण तत्संबंधी ते एका शब्दानेही कुणाकडे बोलले नाहीत की विनोबांचा अनादर होईल असे एका अक्षराने लिहिलेही नाही. मात्र विनोबांशी वेळोवेळी झालेली चर्चा व संवाद त्यांनी 'साधने'तून लोकांपर्यंत यथातथ्य पोहचवले होते.

आश्चर्य असे की अशा कुठल्याही कृतीचा कसलाही अभिमान त्यांच्या वागण्या-बोलण्यात नसे. आणीबाणी उठल्यानंतर 'साधने'चे काम आता पूर्णत्वाला पोहचले. जे करायचे होते ते करून झाले असा कृतार्थ भाव त्यांच्या व्यवहारात कुठेच नव्हता. उलट आणीबाणी हे एक तात्कालिक संकट होते. त्या संकटाला ज्या धैर्याने आणि बुद्धीने तोंड द्यायचे होते ते दिले गेले. आता पू. गुरुजींनी सांगितलेल्या 'रक्तपाताशिवाय समाजवादी समाजरचना स्थापित होवो' या व जयप्रकाश नारायण यांनी संकल्पिलेल्या संपूर्ण क्रांतीसाठी कंबर कसायला हवी, या निर्धाराने 'साधने'ची वाटचाल सुरू झाली.

दारिद्र्य रेषेखाली राहणारी ७० टक्के जनता, मंदिर, पाणवठे, स्मशान यांत प्रवेश नसलेले दलित, वेगवेगळ्या बाजूंनी नाडला जात असलेला आदिवासी, बुरख्याच्या पलीकडचे जग ज्ञात नसलेल्या असंख्य मुस्लीम स्त्रिया, शाळेत जाऊ न शकणारी हजारो बालके, शिक्षण मिळूनही बेकार असलेला तरुण या सर्वांना न्याय मिळावा यासाठी 'साधने'ने कंकण बांधले होते.

## निरंतर झुंज

एक राजवट बदलली पण लोकही बदलायला हवे होते. त्यामुळे यदुनाथांची पत्रकारिता या सर्व आघाड्यांवर कधी एकाकी तर कधी समूहासहित झुंजत राहिली.

समाजजीवनातील उपेक्षितवर्गाचे कल्याण साधणे ही आपल्या पत्रकारितेची व व्यक्तिश: आपलीही जबाबदारी आहे असे यदुनाथ मानत. 'साधने'ने यासाठी 'उपेक्षितांचे अंतरंग' सतत समाजापुढे मांडण्याचा प्रयत्न केला. एकूण प्रसारमाध्यमे ज्या वेळी मुख्यत: उच्च व मध्यमवर्गाच्या सुखदु:खाभोवती घोटाळत होती किंवा 'शोध-पत्रकारितेच्या' नावावर सनसनाटी व भानगडबाज मजकूर छापून जनप्रियता मिळविण्याची धडपड करीत होती, त्या वेळीही 'साधने'ने आपला जनहित करण्याचा व जनहिताच्या गोष्टी निर्भयपणे सांगण्याचा मार्ग सोडला नव्हता.

यदुनाथांची पत्रकारिता आणि त्यांची जीवनशैली यात काडीचाही फरक

नव्हता. ते आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनात जी नैतिक मूल्ये पाळीत तीच ते आपल्या पत्रकारितेतही पाळीत. परदेशी जायला मिळावे म्हणून त्यांनी कधी चुकूनही प्रयत्न केले नाहीत. पत्रकारांना राजकारण्यांमार्फत किंवा उद्योगपतींमार्फत दिल्या जाणाऱ्या पंचतारांकित पार्ट्यांना त्यांची उपस्थिती जवळ जवळ नसायचीच. एक पत्रकार म्हणून त्यांनी कुणाकडेही कसल्याही विशेष सवलती मागितल्या नाहीत. त्यांच्या स्वभावातच ते नव्हते.

'साधने'कडे अनेक मार्गांनी अनेक प्रकारची माहिती यायची. पण माहितीचे हे सर्व प्रवाह यदुनाथ फार समतोलपणे हाताळीत. सर्व पद्धतीच्या प्रदूषणापासून 'साधने'ला मुक्त ठेवण्यात त्यांना यश लाभले. गांधीजी असे म्हणायचे की 'वाचकांना जे हवे ते वृत्तपत्रांनी अवश्य द्यावे पण त्याहीपेक्षा अधिक काही द्यावे.' हे 'अधिक' देण्याचा प्रयत्न 'साधने'ने सतत केला.

### प्रलोभनमुक्त

ज्यांच्या जीवनकार्यावर वाचकांची नितांत श्रद्धा असते अशा अगदी हाताच्या बोटांवर मोजता येणाऱ्या संपादकांमध्ये यदुनाथ होते. स्वत:च्या ध्येयाबद्दल ते ठाम होते आणि ते कुठल्याही प्रलोभनांनी विचलित होणार नाहीत याविषयी 'साधने'च्या हजारो वाचकांची खात्री होती. 'जसा संपादक तसे पत्र' हे वृत्तपत्रसृष्टीतले त्रिकालाबाधित सत्य आहे. यदुनाथजींच्या बाबतीत तर ते शंभर टक्के सत्य होते.

त्यांचा स्वभाव माणसांच्या बाबतीत संग्रही होता. 'साधने'साठी त्यांनी सर्व थरांतली माणसे जोडली. त्यांच्या चैतन्यदायी व कार्यप्रेरक स्वभावामुळे एकदा जी माणसे 'साधने'शी जोडली जात ती तो भावबंध आयुष्यभर जपून ठेवत असत.

हा समाज कसा आहे याचे स्पष्ट व परखड विवेचन करायला 'साधना' कचरली नाही, पण ती एवढ्यावरच थांबली नाही. 'हा समाज कसा असावा' याचेही स्वच्छ दिग्दर्शन तिने केले. उत्तम वृत्तपत्र हे गोरगरिबांचे विद्यापीठ (poor man's university) असते. या विद्यापीठाचे कुलगुरू म्हणून यदुनाथांनी सर्वोत्तम कामगिरी केली.

गांधीजींच्या दृष्टीने 'मानवी मनातील सर्वोत्तम गुणांचा आविष्कार करणे, मन आणि चैतन्याचा परिपूर्ण विकास करणे हेच माध्यमांचे लोकशिक्षणाचे कार्य असते.'

हे कार्य 'यदुनाथजींची पत्रकारिता निरंतर करीत होती. हा समाज सतत चैतन्यमय असावा, गतिमान व उद्यमी असावा, व्यक्तिगत आणि सामाजिक

जीवनात काही एका नीतीने आणि न्यायाने जगणारा असावा अशी त्यांची अपेक्षा होती व त्याच दिशेने त्यांच्या लेखणी आणि वाणीचे प्रयत्नही होते.

जनमाध्यमे सामाजिक न्याय स्थापण्याच्या कार्यात फार महत्त्वाची भूमिका बजावतात. हा सामाजिक न्याय मिळवून देण्यासाठी वेळोवेळी संघर्ष करावा लागतो. त्यामुळे जेव्हा जेव्हा प्रसंग आला तेव्हा तेव्हा 'साधने'ने विरोधाचा झेंडा खांद्यावर घेतला. पण एक पत्रकार म्हणून यदुनाथजींची भूमिका सदैव प्रबोधनकाराचीच राहिली.

## पत्रकारितेचा धर्म

पत्रकारितेचा हा धर्म पाळणे हे आपले कर्तव्यच आहे असे त्यांना वाटे. त्यामुळे अर्धवट ज्ञानावर किंवा माहितीवर आधारलेले कुठलेही वृत्त त्यांनी 'साधने'त दिले नाही. त्यांचे लेखन जसे उथळपणा व मूल्यहीनतेपासून दूर होते तसेच कुठल्याही वैयक्तिक द्वेषापासूनही दूर होते. कुणाचाही बदनामीकारक मजकूर आधी छापून नंतर माफी मागण्याचा प्रसंग 'साधने'वर आणि यदुनाथजींवर कधीही आला नाही. कुठल्याही वृत्ताबद्दल शंका असेल तर ते सोडून द्यावे असा वृत्तपत्रसृष्टीत संकेत आहे. हा संकेत 'साधने'ने सतत पाळला. त्यामुळे अर्धवट, गैरसमजावर आधारलेले किंवा अर्धवट माहिती देणारे कुठलेही वृत्त 'साधने'ने छापले नाही.

बहुतेक सर्व संपादक आपल्या अग्रलेखात स्वत:चा उल्लेख 'आम्ही' म्हणून करतात. ते स्व-आदरार्थी संबोधन नसते; त्या आम्हीत संपादकाव्यतिरिक्त त्या साप्ताहिक किंवा वृत्तपत्राचा वाचकवर्गही सामील असतो. यदुनाथ जेव्हा जेव्हा 'साधने'त लिहीत तेव्हा तेव्हा आपल्या वाचकवर्गाला सोबत घेऊन लिहीत. त्यांच्या स्वभावाप्रमाणे ते 'आम्ही'चा उपयोग कमीत कमी करायचे. आपले म्हणणे तर ठामपणे मांडले जायला हवे, पण त्याला अहंकाराचा किंवा दुराग्रहाचा वारासुद्धा लागता कामा नये याची जाणीव ते सतत ठेवायचे. अनेक लेखांमधून तर ते स्वत:चा उल्लेख 'मी' म्हणूनच करीत.

जनतेशी सतत संपर्क हे त्यांच्या पत्रकारितेचे बळ होते. पण या संपर्कात ललोपती नव्हती. लांगूलचालन नव्हते. वेळ पडली तर सत्ताधाऱ्यांना आणि स्वकीयांनासुद्धा ठणकावून सांगायला ते कमी करीत नसत.

पत्रकारिता यदुनाथजींच्या दृष्टीने एक सांस्कृतिक चळवळ होती. ते असे म्हणायचे की, 'कागदाकडून कागदाकडे नव्हे तर जीवनाकडे पाहण्याची दृष्टी

म्हणजेच खरी पत्रकारिता.' जीवनाकडे पाहण्याची ही निकोप दृष्टी हे 'साधने'चे आणि यदुनाथजींचे बळ होते. मिचेल चार्नली याने बातमीची व्याख्या करताना असे म्हटले होते की, 'समग्र मानवी जीवनाला व्यापून टाकणारा महत्त्वपूर्ण, पवित्र व स्पष्ट वृत्तान्त म्हणजे बातमी.' घटना व आकडेवारी, आशय व तपशील याबाबत बातमीद्वारे 'मानवी समाजाचे हित साधण्याचे' व्रत 'साधने'ने कधीही सोडले नाही. त्यामुळे कुठल्या एखाद्या गटासाठी किंवा मर्यादित विचारांसाठी 'साधना' नव्हती. बातमी ही सामाजिक हिताचे, परिवर्तनाचे शस्त्र आणि शास्त्र आहे असे मानून 'साधने'ने बातम्यांचा सतत पाठपुरावा केला. बातमीची ही कल्पना नैतिक व मूल्यप्रधान मानली जाते. 'साधने'ची पत्रकारिता या अर्थाने नैतिक व मूल्यप्रधान होती.

वृत्तपत्राने न्यायसंस्थेची भूमिका घेऊ नये हे खरे. पण निर्भीडपणे सत्य सांगण्याचे आपले ध्येयही सोडू नये हे तेवढेच खरे. 'साधने'ने स्वत:कडे ही 'शेवटचा शब्द' सांगण्याची भूमिका घेतली नाही. असभ्यता, शिवराळपणा, भडकता, आक्रमकता, व्यक्तिगत निंदा, अफवा आणि जातीयता या सर्व दोषांपासून सर्वथा मुक्त असलेली पत्रकारिता यदुनाथ करीत होते.

आणीबाणीनंतर वृत्तपत्रसृष्टीत झपाट्याने अनेक बदल झाले. या क्षेत्रात एक मूल्यहीन जीवघेणी स्पर्धा घुसली. श्रेष्ठ पत्रकारितेची सारी मूल्ये या स्पर्धेने गुंडाळून ठेवली. पत्रकारांच्या आचारसंहितेचा प्रश्न वारंवार चर्चिला जाऊ लागला. वृत्तपत्र मंडळाने 'पत्रकारांनीच स्वत:ची आचारसंहिता स्वत: तयार करावी' अशी भूमिका घेतली.

## लोकशाही मूल्यांची जपणूक

लोकशाहीच्या मूल्यांच्या जपणुकीसाठी व सर्वसामान्यांच्या हितासाठी 'साधने'ने वसा घेतला होता. 'साधने'ला आजपर्यंत कधी अशा बाहेरून काढलेल्या आचारसंहितेची गरज पडली नाही. 'साधना' महाराष्ट्राच्या वृत्तपत्रसृष्टीत स्वत:च एक मानदंड आहे. इतर अनेक वृत्तपत्रे काळानुरूप स्वत:ची ध्येयधोरणे व रंगरूप बदलत होती पण यदुनाथजी असेपर्यंत 'साधने'च्या ध्येयधोरणांत व रंगरूपातही कुठलाच बदल झाला नव्हता. आचार्य जावडेकरांनी प्रतिपादिलेल्या निर्भय, निर्वैर आणि नि:पक्ष यतिधर्माचे पालन 'साधना' सतत करीत आली.

आजमितीला 'ध्येयवादी पत्रकारिता' असे नाव उच्चारताच काही वृत्तपत्र कर्मचारी कुत्सितपणे हसतात. वृत्तपत्र व्यवसाय व्यावसायिक, अपरिहार्य झाला म्हणून कुठे बिघडले असेही ते विचारतात. त्यांच्या बुद्धिसामर्थ्यामुळे कंपन्यांमार्फत

चालविली जाणारी अत्याधुनिक साधनांनी सज्ज असलेली 'प्रचंड खपाची' पत्रकारिता उर्जितावस्थेत आणि फायद्यात चाललेली आढळते. 'मागणी आणि पुरवठा' या तत्त्वानुसार कोणालाही न दुखवता जाहिरातदारांना जास्त जपत वाटचाल करणारी पत्रकारिता सामाजिक न्याय, गोरगरिबांच्या अडीअडचणींची सोडवणूक आणि देशहित, समाजहित, लोकशिक्षण, लोकजागृती ही कर्तव्ये निर्भयपणे पार पाडण्यात किती समरसून काम करीत आहे, या प्रश्नाचा गांभीर्याने विचार व्हायला हवा. आपल्या व्यावसायिक यशाचा पत्रकारितेच्या आद्यधर्माच्या पालनाशी कितपत संबंध आहे, हा प्रश्नही मुद्दाम लक्षात घ्यायला हवा.'' (पत्रकारितेच्या विश्वात, पृ. ७०, भारतीय विद्याभवन, पुणे केंद्र)

सुदैवाने यदुनाथांना व त्यांच्या पत्रकारितेला हे प्रश्न कधी पडले नाहीत. 'साधने'चे व्यावसायिक यश हा बहुधा त्यांच्या दृष्टीने गौण भाग होता. ती आपल्या धर्मापासून एक तसूभरही ढळू नये म्हणून ते सतत जागरूक असायचे.

दोनशे वर्षांपेक्षा अधिक काळपर्यंत कार्यरत असलेली भारतीय पत्रकारिता सध्या वेगवेगळ्या मार्गाने वाटचाल करीत आहे. १७८० मध्ये जेम्स ऑगस्ट हिक्कीच्या साध्या दोन पानी वृत्तपत्रापासून आता १६-१८ पानांच्या रंगीत-संगीत छपाईपर्यंत तिची वाटचाल दमदारपणे होत राहिली. 'संपादक म्हणजेच वृत्तपत्र' या समीकरणापासून 'संपादकाव्यतिरिक्त वृत्तपत्र' येथपर्यंत पत्रकारिता येऊन ठेपली.

स्वातंत्र्यपूर्व काळातली गोष्ट सोडून देऊया, पण गेल्या अर्धशतकात ग. त्र्यं. माडखोलकर, अनंतराव भालेराव, वा. रा. कोठारी, ना. भि. परुळेकर, आचार्य अत्रे, द्वा. भ. कर्णिक, जयवंतराव टिळक, ह. रा. महाजनी, प्रभाकर पाध्ये, पां. वा. गाडगीळ, गोविंदराव तळवलकर, माधव गडकरी, नीळकंठ खाडिलकर यांसारख्या संपादकांचा महाराष्ट्राचे मानस घडविण्यात खूप मोठा वाटा आहे असे मानावे लागेल.

मराठी वृत्तपत्रसृष्टीचे अंतरंग व बाह्य रूप उलगडून दाखविणारे ग्रंथ या यादीत 'साधना' व 'यदुनाथ थत्ते' यांची नावे फारशी घेत नाहीत. कदाचित एका विशिष्ट विचारसरणीचे समर्थक साप्ताहिक म्हणूनही 'साधने'कडे दुर्लक्ष झाले असावे. यदुनाथांकडे कुठल्याच पद्धतीचा डामडौल किंवा झगमगाट नव्हता. त्यामुळे त्यांच्याकडे लक्ष वेधले जाणेही कठीणच. आणीबाणीत व नंतर अनेकांना 'साधना' आणि यदुनाथ किती मातब्बर पत्रकारिता करतात याचे भान आले. 'मराठी वृत्तपत्राचा इतिहास' लिहिणाऱ्या रा. के. लेलेंना 'साधने'ची आणीबाणीची कामगिरी नोंदवता आली नाही; तरी त्यांनी घेतलेली दोन पानी दखल पुष्कळ महत्त्वाची आहे.

पण ते म्हणतात तशी 'साधना' केवळ समाजवादी वर्तुळात नव्हती. यदुनाथजींच्या पत्रकारितेची दिशा खऱ्या अर्थाने विकासात्मक होती. तिसऱ्या जगाला विकासात्मक पत्रकारितेचा खराखुरा परिचय आताशा कुठे होतोय. प्रख्यात पत्रकार चलपती रावांनी विकास पत्रकारितेची व्याख्या करताना एक मार्मिक वाक्य लिहिले होते, 'कोणताही विधायक बदल नोंदविणे म्हणजे विकास पत्रकारिता होय.'

'साधने'ने यदुनाथजींच्या काळात विशेषत: ग्रामीण भागातल्या शेतीसिंचन, उद्योग, शिक्षण, सांस्कृतिक उपक्रम व कार्यकर्ते या विषयींचे विधायक बदल अगदी आवर्जून नोंदवले आहेत.

रंगास्वामी पार्थसारथींने 'जर्नालिझम इन इंडिया' (Journalism in India) या आपल्या ग्रंथात विकास पत्रकारितेची वैशिष्ट्ये सांगताना लिहिले :

"In addition to the basic task of carrying news stories or reports, it was felt that the press is developing countries should also act as a social monitor, a constructive critic. the stimulator of debates on public issues, a medium of feedback, a watch dog of democracy, a balancing wheel in the government structure, a great social vitaliser, a big enemy of tyrants, the eight arm of liberty, an exposer of public corruption, an interpreter of public events and a professional forum for investigative and interpretative journalism."

'साधने'ची वाटचाल उपर्युक्त सर्व गुणांनी युक्त अशीच होती.

येणाऱ्या काळाला त्याची नोंद घ्यावी लागेल. महाराष्ट्रातल्या किमान तीन पिढ्या 'साधने'च्या विचारांवर पोसल्या गेल्या. राष्ट्रप्रेमाचे, समाजवादी विचारांचे, समाजसेवेचे, लोकांकरता धडपड करण्याचे धडे या पिढ्यांनी 'साधने'कडून प्रेरणा घेऊन गिरवले. 'साधना' आणि 'साधना'कार यदुनाथ थत्ते यांचे हे ऋण या पिढ्या कधीही विसरू शकणार नाहीत.

श्री. अच्युतराव पटवर्धन यांनी फार मार्मिक शब्दांत यदुनाथजींच्या 'साधना'विषयक कार्याचे मूल्यमापन केले आहे.

"आदरणीय साने गुरुजींच्या सहवासाने ज्यांचे समग्र जीवन सुरक्षित झाले अशा आप्त वर्तुळात यदुनाथजी ज्येष्ठ व श्रेष्ठ होते. कारण एस. एम. जोशी, नानासाहेब गोरे आदी साने गुरुजींचे सहकारी अनेक दुसऱ्या संस्कारांनी समृद्ध होऊन मगच साने गुरुजींच्या सहवासात आलेले. त्यामुळे त्यांचे विशिष्ट व्यक्तिमत्त्व

आधीच रेखीवपणे स्पष्ट निरखले होते. वसंत बापट, मधु लिमये, बगाराम तुळपुळे आदी साने गुरुजींच्या अंतेवासीयांवर दुसऱ्या अनेक व्यक्ती व विचारप्रणालींचा प्रभाव अधिक स्पष्टपणे जाणवतो.

''परंतु 'साधने'च्या कामात सर्व वेळ देत राहून यदुनाथजींची जडणघडण साने गुरुजींच्या वळणावर अधिक स्थिरावली होती. गुरुजींच्या मागे त्यांची धडपडणारी मुले महाराष्ट्रभर विखुरलेली होती. त्यांना आपुलकीने जवळ करून गुरुजींच्या संस्काराचे पसायदान सतत त्यांना लाभावे हीच यदुनाथजींची तळमळ होती.''

आजच्या पत्रकारितेची 'साधने'च्या आणि व्यक्तिशः यदुनाथांच्या पत्रकारितेशी तुलना करण्यात फारसा अर्थ नाही. यदुनाथांच्या लेखी 'साधना' चालवणे हे 'बुध्याच घेतलेले सतीचे वाण' होते. त्यात अर-तरला वावच नव्हता. आज असलेले पत्रकारितेचे ग्लॅमरही त्या वेळी नव्हते. आपल्याला एक वाचकवर्ग घडवायचा आहे, त्यावर लोकशाहीचे, समाजवादाचे संस्कार करावयाचे आहेत, देशाची एकात्मता अबाधित राखण्याच्या दृष्टीने त्यांची मने तयार करावयाची आहेत असा एक निश्चित दृष्टिकोण 'साधने'चा होता. आजची पत्रकारिता असा कुठलाही वसा घेत नाही किंवा दावाही करीत नाही.

राजकीय बातम्यांना आज असलेले अतिरेकी महत्त्व हा वृत्तपत्रसृष्टीत एक चिंतेचा विषय आहे. 'साधने'ने हा अतिरेक जाणीवपूर्वक टाळला.

विधायक उपक्रमांकडे पाहण्याची उदार दृष्टी, सर्वसामान्य माणसांच्या प्रश्नांना दिलेले प्राधान्य, जीवनातल्या नवनवीन प्रवाहांचे उत्साहपूर्वक स्वागत, समाजहिताच्या आंदोलनांना दिलेले स्पष्ट पाठबळ व तरुणाईवरचा अखंड विश्वास यामुळे साधनेची पत्रकारिता इतरांपेक्षा आपोआपच वेगळी ठरली.

यदुनाथजींच्या पत्रकारितेविषयी श्री. माधव गडकरी लिहितात, ''एकीकडे ध्येयवादी, दुसरीकडे सत्त्वशील जीवन जगणारे यदुनाथ म्हणजे खरोखर दुर्मीळ असामी होती. हल्ली विचारनिष्ठा गौण ठरत चालल्या आहेत. व्यक्तिनिष्ठांना सर्वत्र महत्त्व येत चालले आहे. तुमच्या विचारांची कदर तुमच्याबरोबर रोज वावरणारे नीट करीत नाहीत असा अनुभव येतो. अशा गर्दीत यदुनाथ म्हणजे, 'ओॲसिस' होते.''

पत्रकारितेच्या जगात यदुनाथजींना जो अपूर्व सन्मान होता तो यामुळेच. आज ही अशी पत्रकारिता करण्याची इच्छा ठेवणाऱ्यांपुढे ते एक आदर्श म्हणून उभे राहतात.

✻

# 'आंतरभारती'चे खरे प्रवक्ते

प्रेमचंदांचे सुपुत्र अमृतराय यांनी प्रेमचंदांचे चरित्र लिहिले आहे. ते म्हणतात, ''पुस्तक ज्या वेळी लिहायला सुरुवात केली तेव्हा हातापायाला कंप सुटला. कळेना पुस्तकात काय लिहावे? ते पूर्ण होणार कसे? त्या उद्वेगात माझ्या हाती एक गुरुकिल्ली लागली. या माणसाचे (प्रेमचंदांचे) सारे आयुष्य देश आणि समाजाशी सांधून पाहिले तर? आणि काय आश्चर्य? सगळे बंद दरवाजे सताड उघडले गेले. एका अतिसामान्य आयुष्याला एक नवा आशय, एक नवी अर्थवत्ता लाभली.''

हे जे काही प्रेमचंदांच्या बाबतीत होते तेच साने गुरुजींच्या आणि यदुनाथजींच्या बाबतीतही होते. साहित्य आणि स्वदेश ही दोघांची दैवते होती. या देशातल्या सर्व जातिधर्मांच्या लोकांवर दोघांचे अपरंपार प्रेम होते. माणसांवरचे त्यांचे हे प्रेम त्या दोघांच्या साहित्यातून ओसंडत असायचे.

देशावरच्या या अमर्याद प्रेमाचाच एक सुसूत्र आणि तर्कशुद्ध आविष्कार म्हणजे गुरुजींची 'आंतरभारती'ची संकल्पना होय. यदुनाथ सर्वार्थाने 'आंतरभारती'चे प्रवक्ते व प्रतीक होते. गुरुजींचे हे स्वप्न प्रत्यक्षात उतरावे यासाठी त्यांनी आपल्या आयुष्याचा क्षणन्क्षण वेचला.

किंबहुना गुरुजींचा जो विचार यदुनाथजींना अगदी मनापासून भावला होता तो विचार 'आंतरभारती'चाच होता. १७ जून १९५० रोजी 'साधने'चा कारभार जेव्हा आचार्य जावडेकर व रावसाहेब पटवर्धन यांनी सांभाळला. तेव्हाच्या अंकात संपादकीयमध्ये त्यांनी लिहिले होते :

''साने गुरुजींच्या जीवनाच्या विविध अंगांपैकी 'साधना साप्ताहिक' आणि

'आंतरभारती' या दोन संस्था चालू ठेवाव्यात असा त्यांच्या निकटवर्ती मित्र-मंडळींनी व सहकाऱ्यांनी निर्णय घेतला व त्यांपैकी पहिले काम आम्हा दोघांकडे सोपवले.'' हे काम त्यांनी अतिशय समर्थपणे पार पाडले. पण 'आंतरभारती'ची जबाबदारी कुणी न सोपवताही यदुनाथजींनी स्वयंप्रेरणेने आपल्या अंगावर घेतली आणि शेवटच्या श्वासापर्यंत ती पार पाडली. किंबहुना या एका अशक्यप्राय वाटणाऱ्या स्वप्नाच्या पूर्ततेसाठी त्यांनी आपल्या आयुष्याचा होम केला असे म्हटले तरी ते अवाजवी ठरणार नाही.

## अद्वैताचा ध्यास

मानवतावादी भूमिकेतून अद्वैताचा विचार करणाऱ्या समाजचिंतकांमध्ये साने गुरुजी होते. 'जिकडे जातो तिकडे माझी भावंडे दिसताहेत' ही भूमिका सामाजिक अद्वैताची भूमिका आहे. पण जिवाशिवाच्या द्वैताची काळजी करणाऱ्या व निरंतर आध्यात्मिक अद्वैताविषयी बोलणाऱ्या या समाजात खरे अद्वैत कधी नांदलेच नाही. 'आपल्या सर्व आंतरबाह्य कृतीतून अद्वैताचा सुगंध जसजसा येऊ लागेल तसतसा भारतीय संस्कृतीचा आत्मा आपणास समजू लागेल', असे गुरुजी सांगत असत. पण असा अनुभव घेण्याची गरज समाजाला फारशी कधी वाटली नाही. धर्म, जात, पंथ, प्रांत, भाषा इत्यादी कारणांवरून शक्यतो एकमेकांपासून दूर राहणे आणि त्याच कारणांनी इतरांचा दु:स्वास करणे ही नित्याची प्रवृत्ती झाली. खुद्द समाजवादी चळवळ ही या दोषांपासून दुर्दैवाने अलिप्त नाही. 'फुटीची बीजे आमच्या रक्तातच आहेत' असे सोयिस्करपणे सांगून वेगळी वाट पकडणे हा सुटकेचा मार्ग होऊ शकेल पण प्रामाणिकपणाचा मार्ग होऊ शकणार नाही. केवळ सदिच्छांनी किंवा सद्‌भावनांनी सामाजिक एकात्मता प्रत्यक्षात येत नाही, त्यासाठी झटून प्रयत्न करावे लागतात.

'आंतरभारती'च्या रूपाने या प्रयत्नांची एक अत्यंत परिणामकारक दिशा गुरुजींनी दाखवून दिली होती. ते त्यांचे केवळ एक स्वप्न होते असे मला वाटत नाही. अखंड प्रयत्नांनी प्रत्यक्षात साकार करण्यासारखे ते वास्तव होते व आजही आहे. 'शांतीनिकेतन' स्थापताना रवींद्र टागोरांनी 'यत्र विश्व भवत्येक नीडम्' ही कल्पना मांडली आणि साकारही करून दाखविली. 'विश्वभारती'च्या रूपाने ही कल्पना मुख्यत: शिक्षक, प्राध्यापक आणि कलावंतांनी प्रत्यक्षात आणली हे लक्षात घ्यायला हवे.

'भारतात भाषा, धर्म, वंश, संस्कृती यांच्यात जरी मोठी विविधता असली व

भाषेवर आधारलेले प्रांत अस्तित्वात आले तरी भाषांनी लोकांना न तोडता त्यांची मने एकत्र साधली पाहिजेत. भाषाप्रेमाचे रूपांतर संकुचित भाषिकवादात होऊ देता कामा नये. ईश्वराला हजारो शिरे व हजार नेत्र असल्याचे वर्णन करण्यात येते. परंतु त्याला हृदय मात्र एकच असावयास हवे!' असे गुरुजी म्हणाले. देश असा एकहृदय असल्याचा अनुभव प्रथमत: कलाकारांनी व नंतर संतसाहित्यिकांनी उत्कटतेने घेतला आहे. त्यांच्यामार्फत तो त्या त्या काळात अन्यत्र उत्क्रांत झालेला दिसतो. भारताची संस्कृती ही सामासिक संस्कृती आहे. वेगवेगळ्या विचारधारा व संस्कृत्या एकमेकांत पूर्णपणे मिसळून गेल्या असा याचा अर्थ नाही. आपापली वैशिष्ट्ये कायम ठेवून त्या सद्भाव आणि सौहार्द्राने एकत्र नांदत आल्या असा त्याचा अर्थ आहे आणि त्या अर्थानेच ही संस्कृती सामासिक संस्कृती आहे.

## सामासिक संस्कृतीचा सम्यक शोध

'आंतरभारती' म्हणजे या सामासिक संस्कृतीचा सम्यक शोध आणि सुस्थापना. बुद्धीने, मनाने आणि परिश्रमाने हा शोध घेण्याचे व सर्वसामान्यांपर्यंत तो शोध सुलभपणे पोहचवायचे काम मुख्यत: शिक्षणक्षेत्रातल्या लोकांचेच मानले जाई. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी एकदा सांगितले होते की 'भारत म्हणजे विस्कळीत गर्दी!' पण गर्दीचेही एकात्म समाजात रूपांतर करता येते. त्यांनीच त्यासाठी तीन मार्ग सांगितले होते. एकमेकांशी समनुयोग (कम्युनिकेशन) साधणे; एकमेकांमध्ये आदान-प्रदानाची वृत्ती वाढविणे व समाजातल्या वेगवेगळ्या घटकांना वेगवेगळ्या मार्गाने शेवटी एका मंचावर आणून जोडणे.

खरे तर या तीनही गोष्टी 'आंतरभारती'त अनुस्यूत आहेत. आज विज्ञानाने इतक्या सोयी उपलब्ध करून दिलेल्या आहेत की या तिन्ही गोष्टी कमालीच्या सोप्या, काही एका मर्यादेपर्यंत अनावश्यकही वाटतात. पण खरा अंतर्विरोध येथून सुरू होतो. संपर्काच्या सर्व साधनांविषयीसुद्धा माणसाला माणसाशी निकट, आत्मीय संबंध प्रस्थापित करता येत नाही. तो जगाच्या एका टोकावरच्या माणसाला टी. व्ही. वर पाहू शकतो, टेलिफोनवरून बोलू शकतो पण तो प्रत्यक्ष भेटला तर त्याला किंवा अगदी जवळच्या माणसालासुद्धा उराउरी, हार्दिकतेने भेटण्याचा विचार त्याच्या मनात येत नाही. मुख्य म्हणजे अशी ऊर्मीच मनात नाही. सर्व समाजाची ही संवेदनहीनता म्हणावी तर दुसऱ्या बाजूला क्षुल्लक गोष्टीमुळे लोकांच्या भावना दुखावतात; त्यांच्या अस्मितेवर आघात होतो. कुणाच्या पेशाचा, कुणाच्या जातीचा, कुणाच्या धर्माचा, तर कुणाच्या नेत्याचा अपमान होतो आणि

एकदम उद्रेक उसळतात. नेमके आपण कोण आहोत? जड आत्मकेंद्रित, संवेदनाशून्य की अत्यंत बेचैन, अंधाभिमानी वा अतिरेकी? व्यक्ती, तत्त्व आणि सिद्धान्त यांना विरोध करण्याचे किंवा स्वीकारण्याचे स्वातंत्र्य सर्वांना आहे. परंतु विरोध करण्याचे मार्ग अधिक आक्रमक, आक्रस्ताळे व हिंसक कशासाठी होत आहेत? आणि स्वीकारण्यासाठी दबावतंत्राचा उपयोग तरी का केला जातो? समनुयोग नाही हे याचे मुख्य कारण वाटते.

## त्रिचनापल्लीच्या तुरुंगात

त्रिचनापल्लीच्या तुरुंगात असणाऱ्या गुरुजींच्या मनात एकाच राष्ट्रीय आंदोलनात भाग घेणारे कैदी वेगवेगळी भाषा असल्यामुळे एकमेकांना समजून घेऊ शकत नाहीत हे पाहिल्यावर 'आंतरभारती'चा विचार डोकावला होता. पुढे त्यांचे जसजसे समाजात अधिक मिसळणे सुरू झाले तसतसे त्यांना प्रकर्षाने हे जाणवले असावे की भाषाभेद फार मोठी अडचण नाही. मोठी अडचण आहे मनभेदाची! मतभेद कालांतराने मिटू शकतात पण मनभेद सहजासहजी मिटत नाहीत आणि त्याचे कारण कुठल्याच पातळीवर हार्दिक समनुयोग नाही. मला आचार्य धर्माधिकारी यांचे विवेचन आठवते. ''भाषा त्या दिवशी कृतार्थ मानली जाईल ज्या दिवशी ती वाग्युद्ध, मल्लयुद्ध आणि शस्त्रयुद्ध या सर्वांना रोखू शकेल.'' मानवाच्या वाणीत इतके सामर्थ्य यावे यासाठी 'आंतरभारती' आहे. तिच्या माध्यमातून एक सांस्कृतिक संवादित्व उभे राहावे अशीच गुरुजींची धारणा असावी. ''अशी एखादी मध्यवर्ती जागा असावी. ज्या ठिकाणी सर्व भाषांचे प्राध्यापक, शिक्षक आणि विद्यार्थी एकत्र राहतील. सर्व भाषांचे वाङ्मय त्या ठिकाणी असेल. प्रत्येक भाषेतले चांगले वाङ्मय दुसऱ्या भाषेत अनुवादित होईल. संस्थेचे स्वतःचे विद्यालय असेल. त्याला लागूनच शेती, हस्तोद्योग शिकण्या-करण्याची व्यवस्था असेल.'' अशी गुरुजींची कल्पना होती. पण केवळ भाषा शिकवणे हे त्या संस्थेचे–आंतरभारतीचे–ध्येय नसेल हे त्यांनी सांगितलेच होते. तेथे दिले जाणारे शिक्षण भाषेच्या पातळीवर सर्व भारताला सामावून घेणारे व मूल्यांच्या पातळीवर मानवी मन उंचावणारे असावे अशी त्यांची मान्यता होती. आनंद, सेवा, श्रम, औदार्य, ज्ञान, विज्ञान व कलांनी समन्वित असलेले सौहार्दपूर्ण शिक्षण म्हणजे 'आंतरभारती'.

## आनंदमय शिक्षण म्हणजे आंतरभारती ज्ञानालय

जिज्ञासा हे ज्ञानाचे मुख्य लक्षण असते. मी कोण आहे, येथपासून माझा देश म्हणजे काय, माझी संस्कृती म्हणजे काय, हे जाणून घेण्याचे आनंदमय शिक्षण

म्हणजे 'आंतरभारती' ज्ञानालय. आजच्या ज्ञानालयातून जिज्ञासाच नाहीशी झालेली आहे. जाणून घेण्याचीच इच्छा नसली तर अपसमज, गैरसमज, अनावश्यक स्पर्धा, अज्ञान व त्यापोटी निर्माण होणारे वैर हे काहीच नष्ट होत नाही. कालांतराने तर या गोष्टी म्हणजे ज्ञान असा भ्रम निर्माण होतो! मुसलमानांचा निखालस द्वेष करणाऱ्या हिंदी भाषेच्या कुणा विद्वान प्राध्यापकाला पाहिले की याला विद्वान कशासाठी म्हणावे असा प्रश्न उभा राहतो?

मध्य काळातील सर्वश्रेष्ठ हिंदी वाङ्मय मुसलमान राज्यकर्त्यांच्या काळात निर्माण झाले. सुरदास, तुलसीदास, मीरा, केशव, घनानंद, पद्माकर, रहीम, रसखान ही सर्व मंडळी मुगलांच्या शासनकाळात निर्भयपणे हिंदू-मुसलमान ऐक्याचा संदेश गात होती. रहीम आणि तुलसीदास हे एकमेकांचे चांगले मित्र होते याची उदाहरणे आजही त्यांच्या साहित्यात आढळतात. उत्तर भारतातल्या कबीराचा गुरू दक्षिणेतील रामानंद होता आणि महाराष्ट्रातील नामदेव निःसंकोचपणे

*'हिंदू पुजै देहरा, मुसलमान मसीत*
*नामा सोई सेबिया, जहाँ देहरा न मसीत'*

असे म्हणतो त्या वेळी ते समनुयोगाचे मुख्य केंद्रबिंदू ठरतात. कबीर, जायसी, दादूदयाल हे सर्व तर पठाण युगातील होते. १८५७ च्या स्वातंत्र्य युद्धात राणी लक्ष्मीबाई होती तशी बेगम हजरत महलही होती. अजीमुल्ला खाँही होता आणि बहादुरशहा जफरही होता. काकोरी कटात फासावर जे चढले त्यात रोशनसिंहसारखा ठाकूर, रामप्रसाद बिस्मीलसारखा ब्राह्मण व अशफाकउल्ला खाँसारखा मुसलमानही होता.

*'ये झगडे और बखेडे मेटकर आपसमें मिल जाओ*
*अबस तफरीक है तुममें यह हिंदु और मुसलमां की'*

हा त्याचा शेवटच्या नज्ममधला शेवटचा शेर होता. ज्यांना वेगवेगळ्या भाषांमधल्या साहित्यात अनुस्यूत असलेली एकात्मतेची अशी सूत्रे जाणून घ्यायची नाहीत; आपल्या विद्यार्थ्यांना ती शिकवायची नाहीत; त्यांच्यात असलेल्या गैरसमजाच्या भिंती पाडायच्या नाहीत; ते शिक्षक ज्ञान देतात म्हणजे काय देतात? शिकवतात म्हणजे काय शिकवतात? 'एक हृदय हो भारतजननी' असे म्हणणे सोपे आहे. पण ती 'एक हृदय' आहे हे मनोमन प्रथम आपल्याला पटायला तर हवे. गुरुजी म्हणायचे, ''ईश्वराला हजार शिरे व हजार नेत्र असल्याचे वर्णन करण्यात येते. परंतु त्याला हृदय मात्र हजार नसून फक्त एकच असते. तसेच भारताला भले हजार शिरे

व हजार नेत्र असोत पण त्याचे हृदय मात्र एकच असावयास हवे.'' किमान ही अनुभूती तरी निर्माण व्हायला हवी. मुळात ही अनुभूतीच नसली तर एकात्मतेच्या अभिव्यक्तीचा प्रश्नच निर्माण होत नाही.

## नेमकी प्रेरणा कुठली?

'आंतरभारती'च्या विचारामागे गुरुजींची नेमकी प्रेरणा काय असावी, असा प्रश्न मनात अनेकदा येतो. देश एक आहे; अखंड आहे; एकात्म आहे आणि तो तसाच राहावा ही प्रेरणा तर स्पष्ट आहे. दुसरी एक प्रेरणा दिसते जिला आध्यात्मिक प्रेरणा म्हणता येईल. गुरुजी म्हणतात, ''मला ईश्वराला भेटण्याची तहान आता नाही. क्षुद्रता कमी व्हावी. विकार, स्वार्थ आणि अहंकारावर विजय मिळवावा असे मला वाटते.'' गुरुजी ज्या गांधीजींना मानत ते गांधीजी मात्र ठामपणे म्हणायचे की, 'मला परमेश्वराला समोरासमोर पहावयाचे आहे. माझी सर्व धडपड त्यासाठी आहे.' गुरुजींना एक अहंकारमुक्त आयुष्य हवे होते. हा भारत साऱ्या जगाचे प्रतीक आहे. याची सेवा म्हणजे मानवजातीची सेवा. ही सेवा करायची असेल तर विकार आणि अहंकाराने मुक्त असलेले पण करुणा, कळकळ आणि तन्मयता यांनी ओतप्रोत असलेले आयुष्य जगायला हवे. मी याला आध्यात्मिक प्रेरणा म्हणतो. 'आंतरभारती' एकार्थाने अशी अहंकार विसर्जनाची प्रक्रिया आहे. पण ही प्रक्रिया शंभर टक्के समाजसापेक्ष आहे. अहंकार विसर्जन साऱ्या समाजासाठी आहे. त्याच्या नवनिर्माणासाठी आहे. त्यात मूळ धरून असलेले आक्रमक अहंकार शमवून टाकण्यासाठी 'आंतरभारती' आहे.

गुरुजींच्या या विचाराचे स्वागत साऱ्या देशभर झाले, हे खरेच. आजही वेगवेगळ्या थरांतील ज्ञानवंतांना, कलावंतांना, कार्यकर्त्यांना आणि एकात्मतेसाठी धडपडणाऱ्यांना 'आंतरभारती'ची कल्पना आकर्षित करीत असते. अशा संस्था देशभर प्रत्यक्षात उभ्या राहिल्या नसतील पण आपापल्या कार्यक्रमात, अभ्यासक्रमात 'आंतरभारती'ची तत्त्वे व कार्यक्रम अनेकांनी समाविष्ट करून घेतले. 'भारत जोडो' यात्रेच्या वेळी त्याचे प्रत्यंतर आले.

## तात्त्विक परंतु व्यवहारोपयोगी

बर्टेंड रसेल म्हणायचा त्याप्रमाणे सर्व प्रकारची प्रगती ही प्रथमत: तात्त्विक असते. व्यवहारात तिचा उपयोग करता येण्याइतकी ती कार्यक्षम आहे की नाही हे नंतर ठरते. एखाद्या सुंदर सिद्धान्ताचा व्यवहारात काही उपयोग नसला तरी त्याचे स्वत:चे म्हणून काही मूल्य राहतेच. कारण जगाला ओळखणे ही अंतिम

साध्यांपैकी एक गोष्ट आहे. 'आंतरभारती' ही व्यवहारोपयोगी सुंदर कल्पना आहे. साऱ्या समाजातून क्रौर्य आणि युद्ध पूर्ण निपटून काढणे जोपर्यंत विज्ञानाला आणि वेगवेगळ्या संघटनांना शक्य होत नाही तोपर्यंत तरी 'आंतरभारती'सारख्या संकल्पनांची गरज भासणारच. पण हे विज्ञानाला व संघटनांना जमले तरी तिची गरज भासत राहणार. कारण अशा उत्कट कल्पनांना साकार करण्याच्या ऊर्मीतूनच श्रेष्ठ कला व श्रेष्ठ ज्ञान जन्म घेत असते.

गुरुजी सुरुवातीला 'प्रांत-भारती' हा शब्द वापरत. नंतर त्यांना 'आंतरभारती' हा शब्द अधिक समर्पक वाटला. 'आंतरभारती'चे गुरुजींना अभिप्रेत असलेले व्यापक स्वरूप यदुनाथजींमुळे शक्य झाले. फार जाणीवपूर्वक त्यांनी प्रांताप्रांतात 'आंतरभारती' पोहचवण्याचा प्रयत्न केला. यदुनाथजींच्या आज्ञेवरूनच मला या कामासाठी उत्तर प्रदेशात व मध्य प्रदेशात अनेक ठिकाणी जाण्याचा योग आला. नंतर ज्या ज्या प्रांतात मी फिरलो त्या त्या प्रांतात मला यदुनाथजींना ओळखणारी आणि मानणारी माणसे भेटली. बहुतेक सर्व त्यांना 'आंतरभारती के यदुनाथजी' म्हणून ओळखत असत.

फार विचारपूर्वक त्यांनी 'आंतरभारती'चा दहा कलमी कार्यक्रम सिद्ध केला होता. सोमनाथच्या श्रमसंस्कार छावण्यांमध्ये या कार्यक्रमांवर प्रदीर्घ चर्चा होत असत. देशातल्या तरुणांना 'आंतरभारती'चा विचार पटायला हवा या दृष्टीने त्यातले अनेक कार्यक्रम आखण्यात आले. बाबा आमटे यांच्या दोन 'भारत जोडो' यात्रांमुळेच हा विचार अक्षरश: देशभर पोहचला होता. यदुनाथ हा दोन्ही यात्रांमध्ये तर होतेच पण पंजाबात बाबांनी जी 'पीस टू पीस' शांती यात्रा काढली त्यातही होते.

हजारो लोकांशी संवाद साधणारे यात्रा हे माध्यम त्यांना मनापासून आवडायचे. महाराष्ट्रात त्यांनी ठिकठिकाणी 'भाव यात्रा' काढल्या. त्यातून खूप माणसे जोडली. कर्नाटक, तामिळनाडू, आंध्र, गुजरात, पंजाब, उत्तर प्रदेश, मध्य प्रदेश यात 'आंतरभारती'चा विचार व कार्यक्रम रुजले ते मुख्यत: यदुनाथजींमुळे.

राष्ट्रीय एकात्मतेची गुरुजींच्या मनात असलेली कल्पना 'आंतरभारती'मुळेच प्रत्यक्षात येऊ शकेल याबद्दल त्यांची पूर्ण खात्री होती.

सोमनाथच्या श्रमसंस्कार छावण्या, गुजरातची शिक्षणसंस्था, संदर्शन यात्रा, देशभर होणारी विविध शिबिरे, शिक्षकांचे व कुमारांचे मेळावे या सर्वांशी ते 'आंतरभारती'चे नाते जोडून देत. शिक्षक-प्राध्यापकांना अनेक भाषा शिकवण्याचा त्यांचा आग्रहही याच कारणासाठी होता.

शाळांमध्ये रोज सकाळी म्हटल्या जाणाऱ्या व पाठ्यपुस्तकाच्या पहिल्या पृष्ठावर छापल्या गेलेल्या प्रार्थनेला जो विशद अर्थ यदुनाथजींनी प्रदान केला त्यामागेही 'आंतरभारती'चेच सूत्र होते.

मला आठवते की १९५७ च्या 'साधने'च्या दोन अंकांमध्ये यदुनाथांनी विनोबांचे 'आंतरभारती'संबंधी विचार शब्दबद्ध केले होते. त्यासाठी ते विनोबांच्या पदयात्रेत सामील झाले. प्रत्येक भाषेच्या वैशिष्ट्यांची विनोबांनी केलेली मीमांसा त्यांनी मोठ्या साक्षेपाने टिपून घेतली होती. त्याच वर्षाच्या एका अंकात श्री. विठ्ठलराव घाटे यांनीही 'आंतरभारती'संबंधी आपली एक योजना प्रकाशित केली होती.

वेगवेगळ्या भाषांमधल्या अनेक साहित्यिकांशी व पंडितांशी यदुनाथांचा 'आंतरभारती'संबंधी सातत्याने पत्रव्यवहार असे. 'साधने'त त्यामुळे जवळ जवळ सर्व भारतातल्या नामवंत लेखकांची प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे हजेरी लागत असे.

प्रत्येक माणूस हा कमीतकमी त्रिभाषिक असला पाहिजे असे विनोबा म्हणत. यदुनाथजी चार-पाच भाषा सहजी समजू शकत. सफाईने बोलतही. या बोलण्याची जातकुळीही वेगळी होती. त्यांचा सर्व भर 'कंटेंट'वर असायचा. सांगताना ते अनुभवाला आलेल्या अनेक गोष्टी सांगायचे. परिणामी त्यांचे भाषण रंजक तर व्हायचेच पण संदर्भसमृद्धही व्हायचे. ते ज्या ज्या प्रांतात जात त्या त्या प्रांतातल्या साहित्याचे संदर्भ त्यांच्या कथनात अगदी सहजपणे येत. त्यासाठी त्यांना कुठलेही प्रयास करावे लागत नव्हते.

'आंतरभारती'च्या आचार आणि विचाराला बळ मिळणार होते 'समान नागरी कायद्या'मुळे. 'साधने'मधून ते सतत या विषयावर लिहीत. जवळ जवळ वर्ष दोन वर्षे त्यांच्या भाषणांचा मुख्य विषयही 'समान नागरी कायदा' हाच असायचा.

## एकात्म सहजीवनाचा यक्षप्रश्न

आपला मुख्य प्रश्न एकात्म सहजीवनाचाच आहे. तो सुटायला हवा असेल तर प्रत्येक समाजघटकाला योग्य तो सामाजिक न्याय मिळायलाच हवा व तो मिळत नसेल तर त्या समाजघटकावर अन्याय करणाऱ्या प्रत्येक बाबीविरुद्ध संघर्ष करायलाच हवा.

मुस्लीम समाजाला त्यांच्या समाजाकडून व अन्य समाजांकडूनही योग्य तो न्याय मिळावा यासाठी यदुनाथजी आयुष्यभर झुंजत राहिले. 'आंतरभारती' ही माणसाला जोडता येणारी भाषा व्हावी ही त्यांची मनापासून धडपड होती.

त्यांच्या दृष्टीने 'आंतरभारती' हे आत्मसंवादाचे सूत्र होते. रवींद्रनाथ टागोरांच्या 'विश्वभारती'त सारे जग एकवटत होते. पण गुरुजींनी आणि यदुनाथजींनीही आधी आपला देश खऱ्या अर्थाने एकात्म व्हायला हवा यासाठी 'आंतरभारती'च्या माध्यमातून धडपड केली.

देशाचे ऐक्य अनुभवावे लागते. हा अनुभव जे घेतात त्यांना 'आंतरभारती'चे अंतरंग त्वरित कळते. या आणि त्या स्वार्थात रमलेल्या व्यक्तींना किंवा गटांना हा विचार एकदम पचनी पडत नाही. कारण त्यासाठी बरेच पूर्वग्रह आणि गैरसमज जाणीवपूर्वक सोडावे लागतात.

या दृष्टीने 'साधने'च्या कुमार अंकात एक सदर चालायचे. 'आपली भावंडे' या शीर्षकाने. त्यात देशांतल्या एकेका प्रांताची सांस्कृतिक ओळख असायची. मुख्य म्हणजे हे सर्व प्रांत यदुनाथजींनी प्रत्यक्ष पाहिलेले होते. मुलांनाही त्याची ओळख व्हावी ही त्यांची धडपड असायची.

समाजातल्या सर्व स्तरांत हा विचार पसरावा याकरिता यदुनाथांनी अपार कष्ट घेतले. बालक, युवक, प्रौढ, वृद्ध, विचारक, अभ्यासक, कामगार, शेतकरी, कष्टकरी या सर्वांसाठी त्यांच्याकडे कार्यक्रम होते आणि या सर्वांना 'आंतरभारती'त सामावून घेता येऊ शकते यावर त्यांचा विश्वास होता.

यदुनाथांच्या विचारसरणीला, 'समाजवादी' वृत्तीला 'राष्ट्रवादी' वगैरे विशेषणे लावता येऊ शकतात पण खरे तर ते 'आंतरभारती'मयच होते. हा देश एका सूत्रात बांधण्यासाठी यापेक्षा वेगळा दुसरा परिणामकारक मार्ग आहे असे त्यांना वाटत नव्हते.

सोमनाथच्या श्रमसंस्कार छावण्यांमध्ये आमची 'आंतरभारती'वर खूप चर्चा व्हायची. चंद्रकांत शहा, सदाविजय आर्य इत्यादी नेहमीचे मित्रही असायचे. हा विचार कार्यक्रमांमध्ये कसा उतरवायचा, या प्रश्नावर यदुनाथांचे उत्तर असायचे, ''तुम्हाला ठोकळेबाज कार्यक्रम कशाला हवेत? स्वतःच्या प्रज्ञेने, बुद्धीने नवे कार्यक्रम शोधा. ही समनुयोगाची प्रक्रिया आहे. ज्याला हा समनुयोग भावतो त्याला मार्ग सुचतोच.''

यदुनाथजींमुळे 'आंतरभारती'त खूप नवे व युवकांच्या साहसी वृत्तीला प्रेरणा देणारे अनेक कार्यक्रम सामील झाले.

## नवभारताच्या निर्मितीची चळवळ

'आंतरभारती' ही नवभारताच्या निर्मितीची चळवळ व्हावी हे त्यांचे स्वप्न

असेल पण या स्वप्नाच्या पूर्ततेकरिता ते अक्षरशः अहोरात्र जगले.

संस्था, संघटना आणि चळवळ अशा तीन स्वरूपांत सार्वजनिक जीवनाची बांधणी होत असते. संस्था आणि संघटना यांचे व्याप खूप असतात आणि या दोघांना अनेक नियमांचे बंधन असते. पण चळवळीत सतत नव्यानव्या गोष्टींचा भरणा होत असतो. चळवळीचे स्वरूप हवे तेवढे व्यापक व उदार करता येते. 'आंतरभारती' एका चळवळीच्या रूपानेच वाढत राहावी अशी दृष्टी सुरुवातीपासूनच राहिली.

श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे, रावसाहेब पटवर्धन, आचार्य श. रा. भिसे, मुईनुद्दिन हॅरीस, आचार्य भागवत यांनी प्रथमतः 'आंतरभारती'च्या कामाची धुरा उचलली होती. श्री. एस. एम. जोशींकडे नंतर अध्यक्षपद आले व पुढे यदुनाथ आणि श्री. सनतभाई मेहता यांनी ते फार समर्थपणे सांभाळले.

राष्ट्रीय ऐक्याचा प्रश्न देशात वारंवार उभा राहताना दिसतो. या ना त्या कारणाने या ऐक्याला सतत तडे पडताना दिसतात.

यदुनाथ असे म्हणायचे की ''न्याय, स्वातंत्र्य, समता आणि बंधुता किंवा आपलेपणा यांच्या आधारावरच देशाचे नवनिर्माण शक्य आहे. हे काम केवळ कायद्याने होणारे नाही. त्यासाठी लोकमानस घडवावे लागेल. लोकांचे प्रबोधन करणे, ते प्रबोधन रचनेच्या रूपाने मांडणे आणि अशा रचनाबदलात व्यत्यय येईल तेव्हा लोकशाहीची चौकट शाबूत राखून संघर्ष करणे अपरिहार्य आहे.''

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी आपल्या अनुयायांना हे सांगितले होते की कुठलेही परिवर्तन घडवायचे असेल तर त्यासाठी प्रबोधन, संघटन आणि संघर्ष या मार्गानेच जावे लागते. यदुनाथांनी या त्रिसूत्रीमध्ये गांधीजींची दोन सूत्रे समाविष्ट केली व प्रबोधन, संघटन, संघर्ष, परिवर्तन आणि एकात्मता हे नवे राष्ट्रीय पंचशील तयार केले.

सुरुवातीला भाषा व साहित्य या माध्यमांचा एकात्मतेसाठी विनियोग करण्याचे अनेक उपक्रम 'आंतरभारती'ने राबवले. पुढे पुढे ही कामे साहित्य अकादमी, नॅशनल बुक ट्रस्ट, सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लॅग्वेजेस इत्यादी संस्था मोठ्या प्रमाणावर करू लागल्या. अन्य संघटनांनाही 'आंतरभारती'चा हा विचार देश जोडणारा आहे असे वाटल्याने त्यांनीही अशा कार्यक्रमांच्या संयोजनात पुढाकार घेतला. मग 'आंतरभारती'ने आपल्या कार्यक्रमात थोडा बदल करून मुख्यतः बाल व युवा पिढ्यांच्या फुलत्या मनांना एकात्मतेच्या दिशेने नेण्यासाठी प्रयत्न सुरू केले.

या उपक्रमात 'आंतरभारती'ला अपार यश मिळाले.

देशात ठिकठिकाणी श्रमसंस्कार छावण्याचे सत्र 'आंतरभारती'ने सुरू केले. श्रमाची, घामाची भाषा ही जागतिक असते. खांद्याला खांदा भिडवून केलेले काम माणसामाणसांतील अंतर वेगाने पुसून काढते. उगारण्यासाठी उठलेले बाहू उभारण्यासाठी झटू लागले आणि श्रमाचा संदर्भच बदलून गेला. श्रमसंस्कार छावणीचे अनेक आयाम आहेत. ते हळूहळू उलगडू लागतात.

सोमनाथच्या जंगलात दरवर्षी न चुकता होणारी श्रमसंस्कार छावणी ही अनेक उपक्रमांची गंगोत्री ठरली. या छावणीतून बाहेर पडलेल्या कार्यकर्त्यांनी जवळपास सगळा देश व्यापून टाकला. एका अखिल भारतीय नागरिकत्वाची भावना या श्रमशिबिरांमुळे युवा जगतात वाढीला लागली.

## युवा स्नेहमीलन

'आंतरभारती'च्या दुसऱ्या एका प्रवृत्तीबद्दल यदुनाथ लिहितात, ''आंतरभारतीचा युवा स्नेहमीलन हा उपक्रमही खूप उपयुक्त ठरला. या कार्यक्रमाचा एक महत्त्वाचा भाग कुटुंब निवास असतो आणि त्यात फार गमतीचे अनुभव आले आहेत. आपल्या विचार आणि वर्तनातील विसंगती प्रकर्षाने त्यातून प्रकट झाली आहे. जाणवली आहे. सामाजिक, आर्थिक भेद आणि विषमता बोचकपणे जाणवली आहे. व्यवहारातील अनुदारता, अनास्थेला सहिष्णू म्हणण्यातला ढोंगीपणा यांचा प्रत्यय आणून देण्याला हे कार्यक्रम उपयोगी पडले आहेत. अनावृत्त, अनौपचारिक सहज दर्शनाने उद्बोधन झाले आहे. परस्परांविषयीचे अनेक अपसमज निवारण करण्याला या कार्यक्रमाचे साह्य झाले आहे. त्याची उदाहरणे द्यायची झाली तर त्याचाच एक ग्रंथ होईल.''

## बाल आनंद महोत्सव

'आंतरभारती'च्या बाल आनंद महोत्सवांनी लहान मुलांच्या रचनात्मक आविष्काराच्या अनंत वाटा मोकळ्या करून दिल्या. या उपक्रमात देशातल्या सर्व बालकांना निमंत्रण असते. ही मुलं-मुली वेगवेगळ्या जातिधर्माच्या घरी आनंदाने राहतात, परस्परांना शिकवतात, शिकतात, एकत्रितपणे नाचतात, गातात. ज्या शहरात बाल आनंद महोत्सव असतो ते शहर 'भारतमय' होऊन जाते. 'हमारा नारा-भारत जोडो' असं म्हणत ज्या वेळी हजारो लहानं बालकं रस्त्याने उच्च स्वरात घोषणा देत चालतात, त्या वेळी एकात्म भारताचे स्वप्न साकार झाल्याचा भास होतो.

'आंतरभारती'ची गाणी आज देशातल्या जवळ जवळ सर्व भाषांमधून गाइली जातात. 'जय हिंद हिंद आनंदभुवन जय भारत वर्ष महान' हे गीत तन्मयतेने तमिळनाडू, केरळ आंध्रातली मुलं-मुली गातात; तशीच आसाम, अरुणाचलमधील मुलं-मुलीही गातात.

'आंतरभारती'च्या कार्यक्रमांनी व गीतांनी 'साझेदारी'चा सर्वांत जवळचा व विश्वसनीय मार्ग मोकळा करून दिला. सुब्बारावांसारखा ७५ वर्षे वयाचा 'युवक' कित्येक शिबिरांमधून तासन्तास हजारो युवक-युवतींना एकात्मतेच्या तालावर झुलत ठेवतो. आपण एकमेकांच्या जवळचे कुणीतरी आहोत; आपली सुखदु:खे एक आहेत आणि आपल्यावरील संकटांना नामोहरण करावयाचे असेल तर आपल्याला एकत्रितपणे झुंजलेही पाहिजे व जगलेही पाहिजे हे मुला-मुलींच्या, युवक-युवतींच्या मनावर ठसत जाते.

बाल आनंद महोत्सवांपासून तर युवा स्नेहमीलनाच्या समारोहापर्यंत अनेक उपक्रमात यदुनाथांची पूर्णवेळ उपस्थिती असायची. तहान-भूक हरपून ते मुलांच्या, युवकांच्या घोळक्यात रमायचे. तासन्तास मुलांनी त्यांना असे वेढून घेतलेले मी प्रत्यक्ष पाहिले आहे. त्या वेळचे यदुनाथांचे रूपही वेगळे असायचे. त्यांच्या अंगी अपार उत्साह संचारायचा. येणाऱ्या काळातल्या एकात्म भारताची स्पंदनशील अमृत-तत्त्वे आपल्या सान्निध्यात आहेत असे त्यांना वाटायचे. या मुला-मुलींमधून, युवक-युवतींमधून भविष्यातला सोनेरी भारत उभा राहील याचा त्यांना पूर्ण विश्वास असायचा.

समन्वयाचे आणि साझेदारीचे रस्ते विज्ञानामुळे उघडले गेले. त्यामुळे 'आंतरभारती'चे कार्यक्रम जेवढे भावसमृद्ध तेवढेच विज्ञानाची बैठक असलेले असावेत; याविषयी यदुनाथ फार जागरूक राहात. मला हे आठवते की एकदा धुळ्यात 'आंतरभारती'ने 'विसाव्या शतकातील नेतृत्व आणि समाजपरिवर्तन' या विषयावर ३ दिवसांचे एक चर्चासत्र घेतले होते. तिन्ही दिवस विषयांची मांडणी प्रा. नरहर कुरुंदकर यांनी केली. यदुनाथ या शिबिरात एखाद्या विद्यार्थ्यासारखे उपस्थित होते. ते कुरुंदकरांच्या व्याख्यानाची टिपणे काढीत, जेवताना किंवा फावल्या वेळात त्यांच्याशी चर्चा करीत. कुरुंदकरांचे परखड, स्पष्ट व तर्कशुद्ध विचार त्यांना फार भावायचे.

एक पत्रकार म्हणून यदुनाथांचा देशभर सन्मान होताच पण 'आंतरभारती'चे प्रवक्ते म्हणून खरे तर ते अधिक ओळखले जात. त्यांचे अनेक भाषांचे ज्ञान त्यांना

या कामी खूप सहाय्यरूप होत असे. मराठी, हिंदी, उर्दू, गुजराती आणि इंग्रजीवर त्यांचे प्रभुत्व होते. आश्चर्य असे की या सर्व भाषांमधल्या काही उत्तम ग्रंथांचे अनुवाद त्यांनी दुसऱ्या भाषांमध्ये केले होते. भारतातल्या बहुतेक प्रांतातील अद्ययावत साहित्यप्रवृत्तींचा यदुनाथांना परिचय असायचा आणि नव्या व जुन्या पिढीतले बहुतेक साहित्यकार त्यांना ओळखत असत. मी या देशातल्या वेगवेगळ्या प्रांतात 'आंतरभारती'च्या कामानिमित्त गेलोय. यदुनाथांना ओळखत नाही असा प्रांत सापडला नाही.

'आंतरभारती'च्या कामाला उठाव मिळावा व देशातल्या तरुणाईच्या विविध प्रयत्नांना योग्य ती दिशा लाभावी यासाठी यदुनाथांनी नॅशनल युथ बोर्डाच्या कामात अधिक रस घेतला. ते या बोर्डाचे सभासद होते. आंतरराष्ट्रीय युवक वर्षानिमित्त त्यांनी जगभरच्या युवा चळवळींचा आढावा घेऊन येथल्या युवकांकरिता सरकारला काय काय करता येईल यासंबंधीचे एक विस्तृत टिपण तयार केले होते. मानव संसाधन विकास मंत्रालयाला आणि युवा कल्याण विभागाला त्यांनी हे सुचवले होते की त्यांनी दिलेल्या आराखड्यावर विस्तृत चर्चा व्हावी व एका व्यापक सद्विचारातून जी युवानीती तयार होईल, त्या नीतीची देशभर अंमलबजावणी काटेकोरपणे केली जावी.

## शोषणाविरुद्ध लढण्याचे हत्यार

'आंतरभारती' ही यदुनाथांच्या दृष्टीने केवळ सांस्कृतिक चळवळ नव्हती. सामाजिक दुष्ट रूढीविरुद्ध आणि शोषणाविरुद्ध लढण्याचे ते एक हत्यारही होते. राष्ट्रीय एकात्मतेचे जे जे कोणी शत्रू असतील त्या सर्वांविरुद्ध निरंतर संघर्ष 'आंतरभारती'त अभिप्रेत आहे. त्यामुळेच यदुनाथ बहुराष्ट्रीय उद्योगांच्या विरुद्ध होते. हे उद्योग या देशातल्या तरुणाईच्या कल्पनेचे व नवनिर्माणाचे पंखच कापून काढणारे आहेत. त्यामुळे 'आंतरभारती'ने स्वदेशीचा प्रचार आपल्या सर्व उपक्रमांतून करावा असेही त्यांना वाटे.

जयप्रकाशजी म्हणाले होते की, ''आदर्शासाठी प्राण पाखडण्याचे सामर्थ्य युवांत असते आणि त्यामुळे ते नव्या मूल्यांचे वाहक बनू शकतात.'' 'आंतरभारती' या नव्या जीवनमूल्यांची वाहक बनावी यासाठी यदुनाथजींनी आपल्या प्रत्येक श्वास पणाला लावला होता.

'आंतरभारती'चा विचार त्यांच्या रक्तात किती भिनला होता याची असंख्य उदाहरणे मला देता येतील. त्यातली मोजकी एक-दोनच देतो.

पंजाबमध्ये आतंकवाद्यांचे साम्राज्य होते तेव्हा जी अगदी एका हाताच्या बोटांवर मोजता येणारी मंडळी पंजाबात गेली होती त्यात मुख्यत्वे बाबा आमटे व यदुनाथ होते. 'भारत जोडो यात्रे'त तर ते होतेच पण नंतरही त्यांनी स्वतंत्रपणे पंजाबला भेट दिली.

जालंदरला लाला लजपतराय यांच्या मातोश्रींच्या नावाने गुलाबदेवी रुग्णालय चालते. आधुनिक सुखसोईंनी सर्वथा सज्ज असलेल्या या हॉस्पिटलचे वर्णन यदुनाथांनी अवघ्या एका वाक्यात केले होते. 'हे रुग्णालय सर्वार्थाने 'आंतरभारती'चे प्रतिनिधित्व करते.' नंतर त्यांनी त्या रुग्णालयाची माहिती मिळवली. मुख्य डॉक्टर लष्करातून निवृत्त झालेले एक शिख, हाताखाली काम करणारे वेगवेगळ्या जातिधर्माचे हिंदू-मुसलमान वगैरे. नर्सेस सर्व केरळच्या, वॉर्डबॉय वगैरे देशांच्या विभिन्न प्रांतांतून आलेले. यदुनाथांना त्यात 'आंतरभारती'चा आविष्कार न दिसता तरच नवल घडले असते.

एकदा ते अलाहाबादला गेले होते. बराच वेळ त्यांनी गंगा-यमुनेच्या संगमावर काढला. देशभरचे यात्रेकरू या संगमावर एकत्र येतात. यदुनाथांना ते दृश्य मनापासून भावायचे. कारण ते म्हणायचे, 'मला या ठिकाणी चालत्याफिरत्या देशाचे दर्शन होते. दोन नद्यांच्या संगमाची ही भूमी अनेक भाषा आणि संस्कृत्यांच्या संगमाची भूमी आहे!!' एकार्थाने 'आंतरभारती'ची भूमी!! जे जे काही भारतीय जनतेच्या हिताचे आणि तिच्यातले आंतरिक ऐक्य वाढवणारे असेल ते ते त्यांना 'आंतरभारती'मय दिसत असे.

## धुंद ध्येयवाद

एकात्म देशाच्या या संकल्पनेने यदुनाथजींना पुरतेपणी झपाटले होते. हा सगळा देश एका भावसूत्रात बांधायचा असेल तर त्यांना 'आंतरभारती'पलीकडे अन्य विश्वसनीय मार्ग दिसत नव्हता. देशातल्या सर्व युवा संघटनांना मर्यादा होत्या. सर्व देशभर पसरलेले एकही मजबूत युवा संघटन नव्हते. अशा स्थितीत त्यांना गुरुजींचा हाच एक विचार असा वाटत होता ज्याचा तत्त्वत: विरोध करण्याचे कुणालाच काही कारण नव्हते.

यदुनाथांनी 'नशा चढवणारी खरी दवा' नावाचा एक लेख लिहिला होता. त्यात त्यांनी उत्कट ध्येयवादाची नशा एकदा चढली की ती कशी उतरत नाही, या विषयी भगवान बुद्ध, ज्ञानेश्वर, तुकाराम, शिवाजीमहाराज, वासुदेव बळवंत फडके, आगरकर, टिळक, गोखले, गांधी ते थेट बहिणाबाईपर्यंतच्या लोकांची उदाहरणे

देऊन समजावून सांगितले होते.

खुद्द यदुनाथांवर 'आंतरभारती'च्या विचाराच्या रूपाने अशाच प्रकारच्या धुंद ध्येयवादाची छाप होती. साने गुरुजींनी भलेही 'आंतरभारती'च्या संकल्पनेला स्वप्न म्हटलेले असो, यदुनाथजींच्या लेखी ते भविष्यात साक्षात होणारे वास्तवच होते.

*

# समाजलक्ष्यी साहित्यकार

अखंड लेखन-वाचन हा यदुनाथजींच्या जीवनाचा अपरिहार्य भाग होता. मूलत: ते विज्ञानाचे विद्यार्थी. गुरुजींनी सांगितले, 'लहान मुलांसाठी सोप्या भाषेत विज्ञानाची माहिती देणारी पुस्तके लिही.' म्हणून त्यांनी लिहायला सुरुवात केली. पुढे अनुभव आणि व्यासंग यामुळे त्यांनी इतक्या विषयांवर लिहिले की आश्चर्याने थक्क व्हायला होते. त्यांची एकूण ग्रंथसंपदा अशी : अकिलीची कहाणी, अणूची रचना उघड करणारे अर्नेस्ट सदरफोर्ड, अबूचा जयजयकार, मामा क्षीरसागर गौरव अंक (अमृत) सहसंपादन, अशी मंडळी बहुत असावी, अक्षयपात्र, आपला मान, आपला अभिमान भाग १, भाग २, आपली जडणघडण, इच्छा, ओळख, आंतरभारती पुरवणी वाचन भाग १, भाग २, कृत्रिम किरणोत्सर्जनाच्या निर्मात्या इरीन ज्योलियो क्युरी, गहिना, ग्रामीण नवविज्ञानाचे प्रवर्तक सतीशचंद्र दासगुप्ता, चाहूल, जग्गूबाबा, जयप्रकाश नारायण, जीवितरक्षक पेनिसिलीन, तपश्चर्या, तवारीख, तुकाराम जगदाळे, दक्षिण ध्रूव प्रदेशाचा शोध, दीपक, देशाच्या संपन्नतेसाठी झटणारे आचार्य प्रफुल्लचंद्र रॉय, निरोप, नोबेल पुरस्कार विजेते डॉ. अब्दुल सलाम, पुढे व्हा, भाग १,२,३, अमृतधारा, प्रकाशपूजक सी. व्ही. रामन, वाळवंटातील झरे, विचारांचे नवे क्षितिज दाखवणारे अल्बर्ट आइनस्टाईन, विद्यार्थ्यांची समाजसेवा, प्रतिज्ञा पाठ्यपुस्तकातील, फुलता निखारा, बेचैनी, भारतीय अणूयुगाचे शिल्पकार, भारतीय भूमीवर अणुऊर्जा आणणारे भगीरथ डॉ. होमी जे. भाभा, भारतीय विज्ञानाचे संघटक डॉ. शांती स्वरूप भटनागर, भारतीय वैज्ञानिक, मधुराणी, मार्टिन ल्यूथर किंग, मुलांचे साने गुरुजी, मुस्लीम

मनाचा कानोसा, मेसॉन कणाचे शोधक डॉ. हिडेंकी युकावा, मृदा यांत्रिकीचे जनक कार्ल तेरझगी, यशाची वाटचाल, युवाशक्तीला आवाहन, राजकन्या सौंदर्यवती, रेशमा, वनस्पतींना बोलविणारे जादुगार जगदीशचंद्र बसू, वानवळा, विनोबा भावे, विनोबा विचारदर्शन, विशिष्ट कक्षा सिद्धान्ताचे जनक निल्स बोर, विज्ञान उपासक (चित्रसंच), एका रात्रीत देऊळ, युवकांस स्फूर्तिकथा, आधुनिक भारत महर्षी, परिमल, तयांचे काळावरती ठसे, प्रेम-चतुर्थी (अनु.) महासागर, सातमाळा पहाडात, भाग्यविधाता, विज्ञानाचा वृक्ष वाढला ऐसा, सदानंद (कादंबरी), समर्थ व्हा संपन्न व्हा, सरहद गांधी खान अब्दुल गफारखान, क्ष-किरणाचे संशोधक डॉ.विलहेलम कोनार्ड रॉटगेन, गांधीजींची धर्मनीती, गांधीजींची विलायत यात्रा, गांधी जीवनदीपिका, लोकमान्य टिळक, आधुनिक वैद्यकीय शोध, अशी मंडळी बहुत असावी, हिंदू-मुस्लीम प्रश्न, पाणी, साने गुरुजी (नॅशनल बुक ट्रस्ट), फुलाबाई, तोरण बांधले, साथीसांगाती, अर्धशतकाची निरंतर धडपड : प्रकाशभाई मोहाडीकर, आचार्य विनोबा भावे आणि साने गुरुजी, मस्तकी हिमालय अंतरंगी अंगार, प्रेमचंद कथामाला भाग १,२,३, महाराष्ट्र आचार्य कुल-राष्ट्रीय एकात्मता गीत संकलन, नवी जंतुनाशके, आपटे गुरुजी जीवन व कार्य, साने गुरुजींची पत्रकारिता, वडील पुरुष (संपा.).

हिंदी भाषेत लिहिली गेलेली त्यांची पुस्तके अशी :

अंधेरे में एक प्रकाश – जयप्रकाश, दुसरा दौर, आवाहन युवा शक्ति को, आटपाट नगर की कहानियाँ, हमारी आन हमारी शान, जमनालाल बजाज, मीरा बहन, विनोबा, साने गुरुजी, विश्व युवा वर्ष, मुसाफिरनामा, चार फरार, अकिली की कहानी, गांधी जीवनदीपिका, छात्र-प्रतिज्ञा, समता की चाह, सेवा दल के बुनियादी सिद्धांत, रेशमा, बालभारती पाठ्यपुस्तक कक्षा छः. ही यादीही पूर्ण आहे असे मला वाटत नाही. यदुनाथ खूप लिहीत असत. त्यांचं सगळं रेकॉर्ड नीट ठेवलं गेलंच असेल असं नाही. या जवळपास १२० पुस्तकांव्यतिरिक्त त्यांनी वेळोवेळी 'साधने'त लिहिलेल्या अग्रलेखांची, व्यक्तिचित्रांची, रिपोर्टस्ची व स्फुट लेखांची नेमकी मोजदाद अजून बाकीच आहे.

यदुनाथ वेळोवेळी हिंदी आणि इंग्रजीतूनही लिहीत. फारच थोड्या लोकांना त्यांच्या इंग्रजी लिखाणाविषयी माहिती असेल. पण 'नागपूर टाइम्स', 'जनता', 'भारत-ज्योती', 'महाराष्ट्र परिचय' व वेगवेगळ्या स्मरणिकांमधून त्यांनी इंग्रजीत अनेक लेख लिहिले आहेत.

## पुरस्कार : राज्य व राष्ट्र पातळीवर

त्यांचा विशाल लेखनसंभार पाहिला की थक्क व्हायला होते. यातल्या काही ग्रंथांना राज्य व राष्ट्रीय स्तरांवर पुरस्कार मिळाले. उदाहरणार्थ, 'अकिलीची कहाणी'ला नवसाक्षर वाङ्मय स्पर्धेचे पारितोषिक मिळाले. 'गहिना'ला नवसाक्षर वाङ्मय स्पर्धेचे भारत सरकारचे पारितोषिक मिळाले. 'चार फरार'ला पुन्हा नवसाक्षर वाङ्मय स्पर्धेचा भारत सरकारचा पुरस्कार मिळाला. 'जग्गूबाबा'ला महाराष्ट्र शासनाचा विशेष पुरस्कार लाभला. 'भारतीय अणुयुगाचे शिल्पकार'ला महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला. कल्याणच्या नागसेन मंडळाने नागसेन पुरस्कारासाठी 'मस्तकी हिमालय अंतरंगी अंगार' या पुस्तकाची निवड केली. मराठी भाषा व साहित्याची जी सेवा त्यांनी केली त्याबद्दल महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने त्यांना दहा हजार रुपयांची गौरववृत्ती घोषित केली. महाराष्ट्र राज्य सरकारच्या हिंदी अकादमीनेही यदुनाथजींच्या 'आटपाट नगरी' या हिंदी पुस्तकाला पुरस्कृत केले होते. 'हमारी शान हमारी आन' या पुस्तकाला अहिंदी भाषी लेखकांसाठी असलेला अ. भा. पुरस्कार मिळाला होता.

हिंदीच्या सर्व प्रमुख दैनिकांमध्ये आणि मासिकांमध्ये त्यांचे लेख प्रकाशित होत असत. नवभारत टाइम्स, धर्मयुग, जनसत्ता, नई दुनिया, सर्वोदय विचार, गांधी मार्ग, राष्ट्रवाणी, लोकमत समाचार, महाराष्ट्र मानस, जीवन साहित्य, मैत्री यांमधून व सर्वोदय विचारसेवेमार्फत किमान वीस-पंचवीस नियतकालिकांमध्ये ते वेगवेगळ्या विषयांवर लिहीत असत. त्यांचे लेखन चौफेर होते आणि त्यांनी साहित्याच्या वेगवेगळ्या शाखांमध्ये लिहिले. कथा, कादंबऱ्या, लहान मुले व नवसाक्षर यांच्यासाठी सोप्या भाषेतल्या गोष्टी, व्यक्तिचित्रे, चरित्रे, वेगवेगळ्या सामाजिक प्रश्नांवरचे विवेचक लेखन, अनुवाद इत्यादींचा त्यात समावेश होतो. या सर्व लेखनक्रियेमागे नेमके काय होते? प्रसिद्धी आणि पैसा यासाठी यदुनाथजी असा उद्योग करण्याची सुतराम संभावना नव्हती. ते तर या दोन्ही बाबतीत पूर्णत: निरिच्छ होते. त्यांच्या लेखनात उपदेशाची मात्राही फारशी आढळत नाही. सल्ला आणि मार्गदर्शन आहे, पण उपदेश नाही. मग एकच प्रयोजन उरते, समाजाचे अशिव-अज्ञान यांपासून संरक्षण करण्याचे किंवा प्रबोधनाचे.

'साहित्य ही एक ज्ञानक्रियाच आहे. आपण आपल्या सर्व इंद्रियाद्वारे जो वास्तवाचा अनुभव घेतो, तोच साहित्यात अभिव्यक्त करतो. अनुभव किंवा अनुभूतीचा मूलत: अर्थ 'प्रत्यक्ष ज्ञान' असाच आहे.'

यदुनाथांनी त्यांना प्राप्त झालेले 'प्रत्यक्ष ज्ञान' सर्व सामान्यांपर्यंत पोहचवण्याचा आटोकाट प्रयत्न केला. जोपर्यंत अज्ञानाच्या अंधारातून जनता बाहेर निघत नाही तोपर्यंत तिला मिळालेला स्वातंत्र्याला फारसा अर्थ नसतो.

## प्रबोधन हाच मुख्य उद्देश

सर्व पद्धतीच्या अज्ञानाविरुद्ध उभे राहणे व लोकांना प्रबुद्ध करणे हाच त्यांच्या साहित्याचा मुख्य उद्देश ठरतो. साने गुरुजींनी सांगितले म्हणून त्यांनी विज्ञानासंबंधीची पुस्तके मुलांसाठी सोप्या भाषेत लिहिली. या पुस्तकांमधून वैज्ञानिकांची चरित्रे जशी कळतात तसेच अगदी सोप्या भाषेत स्पष्ट करून सांगितलेले वैज्ञानिक सिद्धान्तही कळतात. विज्ञानासंबंधीची यदुनाथांची दृष्टी विशाल होती. जीवनाकडे पाहण्याची लोकांची दृष्टी तर्कदुष्ट नव्हे तर शास्त्रीय असायला हवी. विज्ञानात मानवी स्पर्श असला पाहिजे. मानवतेने ते ओले झालेले असले पाहिजे. हे कार्य भारताकडे नियतीने सोपविलेले आहे असे त्यांना वाटत होते. सर्वसामान्य जनतेची विज्ञानविषयक पातळी वाढावी हा त्यांचा उद्देश तर होताच पण मुख्य तळमळ होती, भारतातील उगवत्या पिढीत जागतिक कीर्तीचे संशोधक निर्माण व्हावे याची.

यदुनाथ भूतकाळात रमणारे नव्हते. त्यांच्या डोळ्यांसमोर वर्तमानातले वास्तव व भविष्यातला आशावाद असायचा. त्यामुळे किशोर आणि युवावर्गासाठी त्यांच्या लेखनात खूप काही आढळते. मराठी साहित्य ज्या वेळी मुख्यत: मध्यमवर्गीय जाणिवांच्या आसपास घोटाळत होते तेव्हा यदुनाथजींचे लिखाण आणि 'साधना' तळागाळांतल्या माणसाच्या लेखणी आणि वाणीचे सामर्थ्य वाढविण्याचे कार्य करीत होती.

आपला वारसा हा केवळ पुराणातील देवी-देवतांचा व ऋषी-मुनींचाच नाही, तो वैज्ञानिक प्रगतिशील आणि उदार जीवनदृष्टी ठेवणाऱ्यांचासुद्धा आहे याची जाणीव सर्वांना असावी यासाठी त्यांनी 'आपला वारसा' सारखी पुस्तके लिहिली. आधुनिक भारताच्या नवजीवनाचा पाया ज्यांनी घातला, नाना देवतांची कर्मकांडात्मक पूजा, जातिभेद व इतर दुष्ट रूढींविरुद्ध ज्यांनी युद्ध पुकारले, माणसाला देवत्व लाभावे व पृथ्वीचे नंदनवन व्हावे, विज्ञान आणि अध्यात्म यात विरोध नसावा, 'अध्यात्माचे डोके आणि विज्ञानाचे पाय असतील तरच मानवी जीवन संभवेल,' याची मांडणी करणाऱ्या भारतीयांची चरित्रे त्यांनी रेखाटली. ते नव्या युगातले ऋषीच होते, असे त्यांनी आग्रहाने प्रतिपादन केले.

भारताची फाळणी झाली. दोन्ही देशांमध्ये भयंकर रक्तपात झाला पण अशाही स्थितीत मानव धर्माची जपणूक करणारी काही सामान्य माणसे होती. 'वाळंवटातील झरे' या पुस्तकात असा प्रयत्न करणाऱ्या शूर मुलांची आणि त्याच्या काकांची कथा आहे. धर्मांधता आणि जात्यंधता यांच्या जीवघेण्या वाळवंटातील मुले म्हणजे खळाळत वाहणाऱ्या अमृतमय पाण्याचे झरे होते.

साने गुरुजींची तीन चरित्रे यदुनाथांनी लिहिली. एक लहान मुलांसाठी, दुसरे सर्वसामान्य जनतेसाठी व तिसरे 'नॅशनल बुक ट्रस्ट'च्या सांगण्यावरून सर्व देशासाठी. तिन्ही पुस्तकांचा बाज वेगवेगळा आहे. पण तिन्ही पुस्तकांतून त्या त्या गटाला प्रेरणा मिळते, जीवन जगण्याचा एक संदेश मिळतो.

## सुराज्य आणि युवा

आयुष्यभर ज्या गोष्टींचा ध्यास घेतलेला असतो त्याच गोष्टीचे शेवटच्या क्षणी स्मरण होते असे म्हणतात. राममय (सत्यमय) जीवन असणाऱ्या बापुजींनी शेवटी 'हे राम' म्हणत प्राण सोडले. 'स्वराज्य आणि गीता' हे शब्द उच्चारत लोकमान्य टिळकांनी देहत्याग केला. यदुनाथांच्या जीवनात 'सुराज्य आणि युवा' हे दोन शब्द परवलीचे होते. या स्वराज्याचे खऱ्या अर्थाने सुराज्य व्हायला हवे आणि ते कुणा राजकारणी नेत्याकडून किंवा पक्षाकडून होणार नसून या देशातल्या युवाशक्तीकडूनच होईल, या विषयी ते ठाम होते. त्यामुळे आजच्या आणि येणाऱ्या काळातील युवकांसाठी त्यांनी विशेष करून लिहिले. 'आपला मान आपला अभिमान', 'आपली जडणघडण', 'पुढे व्हा'चे सर्व भाग, 'प्रतिज्ञा', 'तयांचे काळावरती ठसे' ही पुस्तके किशोर व युवावर्गात वारंवार वाचली जातात. त्याचे कारण ही पुस्तके युवा मनाशी नेमका संवाद साधणारी आहेत. त्यात कोरडा उपदेश नाही. युवा वर्गाविषयीचा जो विश्वास त्यांना वाटायचा त्याचा खराखुरा ईसार या पुस्तकांमधून आणि यदुनाथांच्या जीवनशैलीमधून तरुणवर्गाला मिळत असायचा.

'साम्ययोग'च्या २-१०-१९८१ च्या अंकात त्यांनी 'उद्याची आशा : आजचा युवक' या शीर्षकाचा एक लेख लिहिला होता. त्या लेखात ते म्हणतात, ''सुखापेक्षा साहसाची ओढ असणारा, प्रस्थापितांच्या ढोंगाविरुद्ध दंड थोपटणारा, गतानुगतिक जड विचारांशी झुंज देण्याच्या पवित्र्यात ठाकणारा आणि सुखांऐवजी जीवनाच्या प्रयोजनाचा शोध घेणारा तरुण जागोजागी धडपडताना दिसतो.'' त्यांचे हे निरीक्षण अनाठाई नव्हते. ते सतत अशा धडपणाऱ्या मुलांच्या शोधात आणि सान्निध्यात राहात असत. या धडपडीच्या वर्तुळाच्या बाहेर उभी असलेली प्रचंड

'दर्शक' युवाशक्ती या वर्तुळाच्या आत यावी, कार्यरत बनावी यासाठी लेखणी आणि वाणी ही दोन्ही हत्यारे त्यांनी यशस्वीपणे वापरली.

### स्वेट मार्टेनचा प्रभाव

त्यांच्या लेखनशैलीवर साने गुरुजींचा प्रभाव तर होताच पण आणखी एका साहित्यकाराचाही प्रभाव होता. तो म्हणजे ओरिसन स्वेट मॉर्टेन. १९४२ साली तुरुंगात जात असताना यदुनाथना त्यांचे मित्र बा. ए. जोशींनी 'आगे बढो (पुशिंग टु द फ्रंट)' हे पुस्तक दिले. दुसरे पुस्तक होते टरेन्स मॅकस्विनीचे 'स्वातंत्र्याची मूलतत्त्वे'. तुरुंगातच यदुनाथांनी या पुस्तकांचे मराठीत मुक्त भाषांतर केले. मार्टेनच्या पुस्तकात विदेशी उदाहरणे होती. यदुनाथांनी भाषांतर करताना विदेशी उदाहरणांऐवजी त्यात भारतीय उदाहरणे घातली. पुढे याच लेखकांच्या 'हाऊ गेट व्हॉट यु वॉंट' या पुस्तकाचा 'यशाची वाटचाल' या नावाने त्यांनी अनुवाद केला. मार्टेन व्यवसायाने डॉक्टर होता. पण युरोपची सफर करताना त्याने दुर्मुखलेल्या. उदास, निराश तरुणांना पाहिले. मनाने खंगलेल्या या तरुणांकरिता काही केले पाहिजे असे त्याला वाटले. १८९४ मध्ये त्याने 'पुशिंग टु द फ्रंट' हे पुस्तक लिहिले. त्यावर तरुणांच्या अक्षरश: उड्या पडल्या. १८९७ मध्ये त्याने 'सक्सेस' हे मासिक सुरू केले. तरुणांमध्ये ते खूपच लोकप्रिय झाले. तो तरुणांचा खरा मित्र आणि मार्गदर्शक मानला जाऊ लागला. वयाच्या सत्तरीतही त्याच्याभोवती तरुणांचा घोळका असे. त्याची पुस्तके आजही जगभरच्या तरुणांना प्रेरणा देत असतात.

यदुनाथजींवर मार्टेनच्या या जीवनशैलीचा निश्चितपणे प्रभाव होता. ते सतत तरुणांमध्ये वावरत. तरुणांशी संवाद साधण्याची त्यांची एक स्वतंत्र पद्धत होती. मुख्य म्हणजे आपल्यासमोर उभ्या असलेल्या तरुण किंवा तरुणींमधला समाजाला उपयोगी पडणारा गुण कोणता हे ते नेमके हेरत असत. अक्षरश: अशा शेकडो युवक-युवतींना त्यांनी समाजकार्याला लावले. मॉर्टेनप्रमाणेच ते तरुणांचे मित्र आणि मार्गदर्शक मानले जात आणि त्याच्याप्रमाणेच यदुनाथांचे साहित्यही युवावर्गात अधिक तत्परतेने वाचले जाई.

त्यांचे सर्व लेखन बहुतांशी 'समाजस्पर्शी' असले तरी त्यात कृत्रिमतेचा किंवा प्रचाराचा गंधही नव्हता. कलात्मकतेला बाध येऊ न देता ते लेखन करीत. वृत्तपत्रीय लेखनाला त्रोटकपणा व विस्कळीतपणाचा धोका असतो. पण आपली बहुतेक पुस्तके यदुनाथांनी स्वतंत्रपणे लिहिली. वृत्तपत्रात आधी छापून आलेल्या लेखांचे संकलन म्हणून 'मुसाफिरनामा' किंवा 'युवकांस'सारख्या काही ग्रंथांची नावे देता

येतील. मुद्देसूदपणा आणि रचनेचा बंदिस्तपणा हे त्यांच्या लेखनाचे मुख्य गुण होते. चिंतन आणि जिव्हाळा त्यात असेच. ज्यांच्याविषयी लिहायचे त्या व्यक्ती व विषयाविषयी त्यांच्या मनात अपार ममत्व असे आणि असे असले तरी लेखनाची मूळ बैठक नेहमी तर्कशुद्ध असायची. भावूकतेच्या आहारी जाऊन यदुनाथांनी लेखन केलेले वाचनात नाही. तसे लिहिणे त्यांच्या स्वभावातच नव्हते. निरंतर चिंतनाची त्यांना सवय होती. या चिंतनामध्ये अनाग्रहाचा भाग अधिक असायचा. व्यक्ती आणि समूह यांच्या जगण्यातील अनुभव चित्रित करण्यावर त्यांचा विशेष भर होता. 'साधने'तून त्यांनी वेळोवेळी विविध प्रांतांतील कार्यकर्त्यांची जी प्रेरक व्यक्तिचित्रे लिहिली आहेत ती वाचली की त्यांच्या या वृत्तीचा प्रत्यय येतो.

## शिक्षण : निरंतर चिंतनाचा विषय

यदुनाथजींनी सर्वांत जास्त स्फुट लेख शिक्षणाविषयी लिहिले. शिक्षण हा त्यांचा निरंतर चिंतनाचा विषय होता. शाळेत–विशेषत: पूर्व प्राथमिक शाळांमध्ये– एकच एक पाठ्यपुस्तक सर्व मुला-मुलींना देणे त्यांना गैर वाटत होते. ह्या पातळीवर विपुल चित्रे असणारी किमान २५-३० पाठ्यपुस्तके असावीत व ती फिरत्या पद्धतीने सर्व मुलांना हाताळता यावीत. त्यासाठी एका विद्यार्थ्याने फक्त एकच पुस्तक घेणे पुरेसे आहे असे त्यांना वाटे. आपली पाठ्यपुस्तके दरवाजा नसून भिंती आहेत असे ते म्हणायचे. त्यात बरेच तथ्य होते. शिक्षणात रचना आणि संघर्ष या दोन प्रेरणा असायलाच हव्यात. त्या नसल्या तर शिक्षण हे शिक्षणच राहणार नाही, अशी त्यांची ठाम समजूत होती.

शिक्षणाला प्रबोधनाचे स्वरूप प्राप्त व्हावे यासाठी त्यांनी अपार धडपड केली. शाळांच्या पाठ्यपुस्तकांमध्ये असलेल्या प्रतिज्ञेचा अर्थ स्पष्ट करणारे त्यांचे 'प्रतिज्ञा' हे पुस्तक यामुळेच खूप गाजले. विद्यार्थ्यांमध्ये नवा मार्ग धुंडाळण्याची व चाकोरी सोडून जगण्याची जिद्द निर्माण व्हायला हवी यासाठी त्यांची निरंतर धडपड असे. शिक्षण जीवनाभिमुख असावे यासाठी निरंतर प्रयत्न करणारे फारच थोडे पत्रकार व साहित्यकार आढळतील. यदुनाथांनी स्वत: ग्रंथनिर्मिती करताना याचे भान ठेवले होते की लेखन हे केवळ जनतेच्या मनोरंजनासाठी, तात्कालिक कुतूहलपूर्तीसाठी किंवा सद्य:स्थितीच्या दृढीकरणासाठी नसून ते उद्याच्या समाजाची घडण सुलभ व्हावी यासाठी आहे. राष्ट्रनिष्ठा, लोकशाही, समता, जातिधर्मातीतता आणि विज्ञानाभिमुखता ही तत्त्वे लेखनव्यवहारातून समाजात रुजली पाहिजेत, हे ध्येय त्यांनी सतत डोळ्यांसमोर ठेवले होते.

गुरुजींनी सांगितले म्हणून त्यांनी विज्ञान आणि वैज्ञानिक यांच्याविषयी खूप लिहिले. अनेक देशी-विदेशी वैज्ञानिकांची चरित्रे साक्षेपाने लिहिली. मात्र हे सर्व करण्यामागे या समाजात विज्ञानाभिमुखता वाढावी ही कळकळ होती. या वैज्ञानिकांच्या जीवनचरित्राला त्यांनी दिलेली केवळ शीर्षके पाहिली तरी त्यांच्या कळकळीचा व विशाल दृष्टीचा प्रत्यय येतो. उदाहरणार्थ, ग्रामीण नवविज्ञानाचे प्रवर्तक सतीशचंद्र दासगुप्ता, जीवितरक्षक पेनिसिलीन, विचारांचे नवे क्षितिज दाखविणारे अल्बर्ट आइनस्टाईन, देशाच्या संपन्नतेसाठी झटणारे आचार्य प्रफुल्लचंद्र रॉय वगैरे.

या देशाविषयी यदुनाथजींच्या मनात अपरंपार प्रेम होते. हा देश स्वतंत्र व्हावा यासाठी झालेल्या संघर्षात एक सैनिक म्हणून ते आघाडीवर होतेच पण तो सुजलाम् सुफलाम् व्हावा यासाठी सर्वाधिक रचनात्मक प्रयत्न करणाऱ्यांमध्येही ते अग्रभागी होते. आपल्या वाणी आणि लेखणीचा उपयोग त्यांनी या समाजात समता नांदावी, खऱ्या अर्थाने तो जातिधर्मनिरपेक्ष व्हावा यासाठी निरंतरपणे केला.

वैज्ञानिकांव्यतिरिक्त चरित्रलेखनासाठी जे नायक त्यांनी निवडले त्या सगळ्यांनीच या देशाच्या व येथल्या समाजासाठी आपले सर्वस्व अर्पण केलेले होते. महात्मा गांधी, साने गुरुजी, जयप्रकाश नारायण, आपटे गुरुजी, आचार्य भिसे, राजर्षी शाहू यांची त्यांनी लिहिलेली चरित्रे इतरांपेक्षा वेगळी ठरतात. ती विद्वज्जनांसाठी नाहीत. ती बहुजन समाजासाठी आहेत. सर्वसामान्य वाचकालासुद्धा त्या महान चरित्रांची ओळख व्हावी, त्याच्या जीवनावर त्यांचा परिणाम व्हावा या दृष्टीने ती लिहिली गेली. या लेखनातही व्यक्तिपूजेचा भाग नाही.

प्रसिद्ध उद्योगपती श्री. नवलमलजी फिरोदिया यांचे एक छोटेखानी चरित्र 'तोरण बांधले' या शीर्षकाने यदुनाथांनी लिहिले होते. पुढे मी त्याचा हिंदी अनुवाद केला. या पुस्तकातही बजाज उद्योग उभारण्यात श्री. नवलमलजी यांनी किती कष्ट उपसले व कशा दूरदृष्टीने या स्कूटरचा पहिला कारखाना काढला. या संबंधीच्या प्रयत्नांचा आढावा त्यात होता. व्यक्ती लहान असो की महान, तटस्थपणे तिला जोखणे व तिच्यातल्या गुणांचा योग्य तो गौरव करणे हे त्यांच्या स्वभावातच होते.

यदुनाथांनी लहान मुलांकरिता लिहिले; नवसाक्षरांकरिता लिहिले; युवकांसाठी लिहिले आणि सर्वसामान्य जनतेसाठीही लिहिले. वृत्तपत्राच्या जगात आणि साहित्यक्षेत्रात त्यांच्या लेखनाला राजमान्यता व लोकमान्यताही होती. केंद्र सरकार व राज्य सरकारने या लेखनाबद्दल त्यांना वेळोवेळी पुरस्कृत केले. मराठी भाषा

आणि साहित्याची लक्षणीय सेवा केल्याबद्दल महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने त्यांचा दहा हजार रुपयांची गौरववृत्ती देऊन सत्कार केला. या सत्कार आणि पुरस्काराच्या पलीकडे यदुनाथजी होते.

## लोकशाहीचे खरे समर्थक

लोकशाही व लोकशाहीची मूल्ये यावर यदुनाथांचा अपार विश्वास होता. या समाजाची स्थिती बदलायची असेल तर येथे एखादा हुकूमशहा यायला हवा असे त्यांना स्वप्नातसुद्धा कधी वाटले नसेल. या लोकशाहीच्या प्रेमापोटीच ते आणीबाणीविरुद्ध एवढ्या तेजस्वीपणे लढले.

आचार्य शंकरराव जावडेकर यांचा एक श्लोक फार प्रसिद्ध आहे.

*राज्यशक्तिरधिष्ठानम्*
*लोकशक्तिर्हि तत्वत:*
*तयोऽस्तु विग्रहे प्राप्ते*
*लोकशक्तिर्विदिष्यते।*

राज्यशक्तीचा पाया लोकशक्ती हाच असतो. पण त्यांच्यात विरोध आला तर राज्यशक्तीपेक्षा लोकशक्ती प्रभावी आहे हे लक्षात ठेवायला हवे, असा या श्लोकाचा अर्थ आहे. यदुनाथांनी राज्यशक्तीपेक्षा श्रेष्ठ असलेल्या या लोकसत्तेच्या सबलीकरणाकरिता खूप खटपट केली. संयुक्त महाराष्ट्राची चळवळही त्यांना यामुळेच लोकशाहीच्या सबलीकरणाची चळवळ वाटत होती. वैचारिकदृष्ट्या ते पूर्णपणे या चळवळीच्या बाजूने होते.

आपल्या एका लेखात (लोकशाहीची आराधना) त्यांनी लिहिले होते की ''लोकशाहीचा अर्थ लोकांच्या सक्रिय सहभागावर चालणारे राज्य. लोकांचा मूक सहभाग लोकांना यंत्राची किंवा पशूची कळा आणतो. हा असंस्कृतपणाचा कळस होय. लोकांचे सुबुद्ध सहकार्य लोकशाहीला बळकटी आणतेच, पण विकासाची प्रक्रियाही गतिमान करते.''

लोकांचा हा सार्थ सहभाग हवा असेल तर त्या त्या राज्याचा कारभार तिथल्या भाषेतच चालला पाहिजे हे ते आवर्जून नोंदवतात. पण या सोबत ते आणखी एक महत्त्वाचा मुद्दा नोंदवतात.

''भाषा हे दुधारी हत्यार आहे. या साधनाचा वापर करून लोकसहकार्याची भावना उद्दिपित करता येते; त्याप्रमाणे लोकांवर मानसिक गुलामगिरीही लादता येते. मराठी भाषेला महाराष्ट्राच्या व्यवहारात तिचे योग्य स्थान मिळाले असते तर

शोषणाचे अनेक दरवाजे आपोआपच बंद झाले असते. मराठी भाषेच्या राजकीय पैलूकडे अधिक लक्ष दिले गेले. त्या मानाने आर्थिक, सामाजिक, वैचारिक, धार्मिक, आध्यात्मिक इत्यादी सांस्कृतिक अंगांची उपेक्षा करण्यात आली; त्यामुळे महाराष्ट्र राज्याची राजकीय उद्दिष्टे काही प्रमाणात पदरी पडली पण इतर अंगांतून तो प्रवाह खळखळून वाहिला नाही.''

यदुनाथांचे हे मत होते की सार्वजनिक जीवनात आपण राजकारणाला अवास्तव महत्त्व दिले आहे. राजकारण हे स्वभावत: शक्तिच्छेद करणारे असते. काही काळ तरी या राजकारणाला तबेल्यात ठाणबंद करून जीवनाची इतर अंगे फुलविली पाहिजेत. लोकशक्तीची आराधना कशी करावी याचेसुद्धा एक शास्त्र आहे व तिच्या मूल्याचे जतन करणाऱ्यांनी ते मुळातच जाणून घ्यायला हवे. पण म्हणून सत्ता म्हणजे पाप आहे अशी त्यांची सोवळी समजूत नव्हती. विकासोन्मुख देशात सत्तेला अतिरिक्त महत्त्व चढते हे ते जाणत होते. पण स्वातंत्र्यानंतर देशात सत्तेचा लोभ आणि मद यामुळे इतका काही सावळा गोंधळ माजला की ही लोकशाहीच निकामी झाली आहे असे अनेकांना तीव्रतेने वाटू लागले. पण यदुनाथांचे यासंबंधीचे मूल्यांकन अगदी सूर्यप्रकाशाइतके स्वच्छ होते.

ते लिहितात, ''आपोआपवादी माणसे लोकशाही निकामी करीत असतात. आपल्या देशात अशा मंडळींची संख्या मोठी असल्याने आमची लोकशाहीदेखील आशाळभूतपणे वाट पाहण्याचेच शिक्षण देत असते.

''लोकशाहीचा आविष्कार जेथे फक्त सत्ता आणि शासन यातूनच होतो, तेथील लोकशाही निकामी न वाटली तरच आश्चर्य...

''लोकशाहीची किंमत मतयंत्रणेच्या प्रभावावरून मोजता येत नसते. नागरिकांचे स्वयंप्रेरित प्रयत्न ज्या मानाने भरभराटतील त्या मानानेच लोकशाही भरभराटू शकते. नागरिकांचे संघटित स्वयंप्रेरित प्रयत्न जेथे संपुष्टात येतात तिथे लोकशाहीचा एक सांगाडा तेवढा उभा राहतो. लोकशाहीचा हा तकतराव दिखाऊ आणि तकलादू असतो.

''लोकशाहीचा मूलाधार लोकांचे स्वयंप्रेरित संघटित प्रयत्न हाच असतो. असे स्वयंप्रेरित संघटित प्रयत्न भरभराटतात तेव्हा लोकशाहीला अंकुश लावणारी पर्यायी शक्ती समाजात उभी ठाकत असते.'' यदुनाथांनी समाजातली ही स्वयंप्रेरित संघटित शक्ती जागृत व कार्यरत व्हावी यासाठी अपरंपार प्रयत्न केले.

ज्यांची नवसर्जनाची शक्ती कुंठित झालेली नाही व जे एखाद्या महान उद्दिष्टाशी

स्वत:ला जोडून घेतात अशी मूठभर व्रती माणसेसुद्धा समाजाचा प्रवाह बदलू शकतात. त्यांनी अंगीकारलेली व्रते म्हणजेच सामाजिक मूल्ये असतात. ही व्रती माणसे समाजाला या व्रतांची सवय लावू शकतात. लोकशाही ही अधिक लोकमतदर्शक, लोकांची कार्यशक्ती जागवणारी, कार्यक्षम, प्रमाणित, शुद्ध चारित्र होण्याची शक्यता त्यामुळे संभव होते.

यदुनाथ म्हणतात, 'लोकशाही म्हणजे दुसऱ्यांच्या नावाने खडे फोडण्याचे व आपण नामानिराळे राहण्याचे स्वातंत्र्य नव्हे. लोकशाही म्हणजे जबाबदारी घेण्यासाठी संघटना घेऊन पुढे सरसावणे होय.'

## संघटित जीवनाचा महामंत्र

लोकशाही हा संघटित जीवनाचा महामंत्र आहे यावर त्यांचा पूर्ण विश्वास होता. राजकारण्यांनी व स्वार्थी पुढाऱ्यांनी या लोकशाहीचे वातावरण कितीही गढूळ केलेले असो ते बदलण्याचे व सर्वतोपरी निखळ करण्याचे सामर्थ्य या देशाच्या तरुणाईत आहे याचाही त्यांना विश्वास होता. ज्या ज्या ठिकाणी संघटित होण्याचे असे विधायक प्रयत्न चालत असतील, त्याची ते अगदी आवर्जून दखल घेत. उदाहरणार्थ, १९९० मधल्या सार्वत्रिक निवडणुकीचे पडघम वाजू लागले तेव्हा त्यांनी बेळगावच्या 'तरुणभारत'मध्ये (५-८-१९८९) 'लोकशाहीच्या संरक्षणासाठी सिद्ध होऊया' या शीर्षकाने एक छोटासा लेख लिहून श्रीमती विमलताई ठकार यांच्या मार्गदर्शनाखाली काम करणाऱ्या गुजरात बिरादरीच्या सात कलमी कार्यक्रमाची माहिती सर्वदूर पोहचवली होती.

खरे तर लोकशाहीशी संबंधित असा एकही पैलू नाही ज्यावर यदुनाथांनी लिहिले नाही. ही 'लोकशाही संस्कृती' सर्वांगांनी समृद्ध व्हावी यासाठी त्यांची धडपड होती.

लोकशाहीत पक्ष राज्यकर्ते असतात पण राजे नसतात. राजा असते सर्वसामान्य जनता. राज्याचा विकास म्हणजे या जनतेचा विकास. या विकासाचे आणि जनसंवादाचे नाते फार जवळचे असते. नभोवाणी, वृत्तपत्रे, दूरदर्शन, चित्रपट इत्यादींसाठी जनसंचार माध्यमे ही या सर्वसामान्य जनतेला प्रबुद्ध करणारी माध्यमे असतात. त्यांना सामाजिक वास्तवाचे भान सतत ठेवावे लागते. सामाजिक न्याय प्रस्थापित करायचा असेल तर माध्यमांनी प्रत्येक ज्वलंत सामाजिक प्रश्नांची जनतेच्या बाजूने तड लावायला हवी अशी अपेक्षा असते.

स्वातंत्र्योत्तर भारतात सामाजिक विकासाची गती हळूहळू अवश्य वाढत गेली

पण त्या प्रमाणात जनसंचार माध्यमांची लोकाभिमुखता मात्र वाढली नाही. माहितीचे न्याय्य वितरण होत नव्हते व सामाजिक न्याय नाकारला जात होता. महिला विधेयकाची संसदेत आज जी स्थिती आहे ती पाहिली की हा न्याय कसा नाकारला जातो याचे दारुण प्रत्यंतर आपल्याला येते.

या सामाजिक न्यायाच्या प्रस्थापनेसाठी यदुनाथांची धडपड असायची. 'भारतात समाजवादासहित लोकशाहीचे राज्य येवो', या पूज्य साने गुरुजींच्या स्वप्नाची पूर्तता तेव्हाच होण्याची शक्यता होती जेव्हा समाजातल्या प्रत्येक घटकाला त्याचा न्याय हक्क मिळण्याचे मार्ग सुलभ व मुक्त असतील. ते तसे व्हावेत यासाठी यदुनाथांनी आपल्या वाणी आणि लेखणीची हत्यारे सतत वापरली.

## राजनीतीचे लोकनीतीत रूपांतर

राजनीतीचे अध्यात्मीकरण करण्याचे प्रयत्न खरे तर खूप आधीपासून होत आले. भारतीय राजकारणात हा प्रयोग सर्वात प्रथम महात्मा गांधींनी केला असला तरी इतिहासात असा प्रयत्न प्रथमतः करण्याचे श्रेय महंमद पैगंबराला जाते. त्याला त्यात यश मिळाले नाही ही गोष्ट अलाहिदा.

विनोबा असे म्हणायचे की, ''राज आणि नीती हे शब्द एकमेकांना छेद देतात. नीती येते तेव्हा राजव्यवस्था कोलमडून पडते. राजव्यवस्था येते तेव्हा नीती नष्ट होते. त्यामुळे या पुढे राज्य नको, प्राज्य हवे.

''दोन मोठे प्रयोग झाले. शंकराचार्य, गौडपाद, शुकदेव इत्यादींचा एक प्रयोग होता. त्या महापुरुषांनी निवृत्त होऊन सरळ जनतेत जाऊन काम केले. गांधीजी, पैगंबर, नानक, रामदास यांचा दुसरा प्रयोग होता. त्यांनी राजनीतीला 'स्पिरिच्युअलाईझ' करण्याचा प्रयत्न केला. दोन्ही प्रयत्न चांगले होते. दोन्हीकडे सत्पुरुष होते. पण दोन्ही प्रयत्नांमध्ये अपूर्णता होती. आम्ही काय करावे? आम्हाला राजनीतीला धर्मरूप देण्याऐवजी राजनीतीला खंडित करून लोकनीती स्थापन करायची आहे. हा एक स्पष्ट आणि पॉझिटिव्ह (विधायक) कार्यक्रम आहे.''

यदुनाथजींना हा मार्ग मान्य होता. लोकनीती सुदृढ झाली तर राजनीतीच्या अनाचाराला आपोआप पायबंद बसेल असे त्यांना वाटे. गुण जसे लोकनीतीत असतात तसे राजनीतीतही असतात. त्या दोघांचा मेळ साधता आला तर एक सर्वोपयोगी मार्ग निघू शकेल असे त्यांना वाटे. म्हणून प्रचलित राजकारणाचे केवळ वाभाडे काढण्याचे कार्य ते करीत बसले नाहीत. आपल्या लेखनाद्वारे ते लोकशाहीचे अधिकाधिक शुद्ध रूप कसे व कोणते असावे यासंबंधी सतत

मार्गदर्शन देत राहिले. या संदर्भात विनोबा आणि जयप्रकाश नारायण हीच त्यांची मुख्य प्रेरणा होती.

जयप्रकाशांवर त्यांनी 'जयप्रकाश' या शीर्षकाने एक दीर्घ लेख लिहिला होता. त्या लेखात ते स्पष्टपणे म्हणतात, ''शब्द जेव्हा अपयशी ठरतात तेव्हा जीवन हाच प्रबोधनाचा एकमेव मार्ग उरतो! जयप्रकाशांनी भूदानमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक क्रांतीसाठी जीवनदान केले तो प्रसंग प्रत्यक्ष पाहायला मिळाला हे मला माझे भाग्य वाटते. असे उत्कट भावनामय प्रसंग राष्ट्राच्या इतिहासात दुर्मीळ असतात! आजचे राजकारण वारांगनेसारखे आहे. अद्याप नृपनीतीची चाकोरी त्याने सोडलेली नाही. राजनीतीचे लोकनीतीत रूपांतर झाल्यावाचून विकासोन्मुख देशात लोकशाहीचा टिकाव लागणार नाही.''

यदुनाथांचा लोकशाहीचा असलेला हा कळवळा मुळीच अनाकलनीय नाही. गुरुजींविषयी जेव्हा जेव्हा यदुनाथ लिहीत तेव्हा तेव्हा त्यांच्या मनात लोकांविषयी असलेल्या अपार कळवळ्यांचा आवर्जून उल्लेख करीत. गुरुजींचे अश्रू त्यामुळेच त्यांना 'अंगार फुलवणारे अश्रू' वाटत. मराठवाड्याच्या २१ डिसेंबर १९८६ च्या अंकात या नावाच्या शीर्षकाने त्यांनी गुरुजींविषयी जो लेख लिहिला होता त्यात ते लिहितात–

''रात्रंदिवस ते झुरतात कारण त्यांना नवसमाजाच्या निर्माणाच्या वेणा सुरू झालेल्या असतात... त्यामुळे डोळ्यांत येणाऱ्या अश्रूंचे मोल अगदीच वेगळे असते. एका स्वप्न हरवलेल्या राष्ट्राला स्वप्न देणारे, नव्या समाजरचनेसाठी प्रेरणा देणारे ते अश्रू असतात.''

यदुनाथांनासुद्धा नवसमाजनिर्मितीची प्रचंड आस होती. त्यासाठी या देशातील तरुणाई सर्वार्थाने जागृत व्हायला हवी म्हणून ते प्रबोधनाचा प्रचंड वन्ही चेतविण्याचे कार्य वाणी आणि लेखणीद्वारे अव्याहतपणे करीत राहिले. पुढे पुढे तर 'लोकांसाठी काम' ही रूढ भूमिका सोडून 'लोकांसोबत काम' ही नवी भूमिका कार्यकर्त्यांनी स्वीकारावी, याचा ते आग्रह धरीत. सत्तेने पादाक्रांत केलेले जीवनाचे क्षेत्र सत्याग्रही लोकशक्तीच मुक्त करू शकेल यावर त्यांचा पूर्ण विश्वास होता.

## लेखनविषयक भूमिका

स्वतःच्या लेखनासंबंधी यदुनाथजींची भूमिका 'ललित'मध्ये त्यांनीच लिहिलेल्या एका टिपणात फार स्पष्टपणे व्यक्त झाली आहे.

''लेखक आपल्या आसपासचे वास्तव जीवन तटस्थपणे पाहतो. घटनांचे

पृथक्करण करतो. त्यामागील तर्कसंगती जाणून घेण्याचा प्रयत्न करतो आणि ती अनुभूती कलात्मक पद्धतीने मांडतो. अनुभूती जेवढी प्रखर असेल तेवढ्याच तोलामोलाने ती प्रकट व्हावी म्हणून तो त्यासाठी माध्यम शोधण्याची धडपड करतो. अनुभूती हृदय ओसंडून वाहू लागते. त्यातून जे उतरते ते लेखन. याशिवायचे जे लेखन ते वर्णनात्मक असते. वर्णन हे लेखनाचे अटळ असे अंग असले तरी तेवढ्याने लेखकाच्या सर्जनशीलतेचे समाधान होत नाही.

''काही घटकद्रव्ये एकत्र करणे वेगळे आणि त्या घटकद्रव्यांचा रासायनिक संयोग होणे वेगळे. रासायनिक संयोगानंतर उपलब्ध होणारे द्रव्य आणि घटकद्रव्ये एकत्र आणून मिसळल्याने बनणारे द्रव्य यांत फरक असतो. प्रत्येक रासायनिक क्रियेत ऊर्जानिर्मिती म्हणजे शक्तिसर्जन अपरिहार्यपणे घडून येते. तशीच काहीशी स्थिती लेखनाची असते. लेखकाची कलाकृती केवळ घटकद्रव्ये एकत्र आणल्याने सिद्धीस जात नसते. रासायनिक संयोगानंतर जसे नवेच द्रव्य जन्माला येते तसे लेखनकृतीचे होते. घटकद्रव्ये तीच, पण सर्जित वस्तू रूप-गुणांनी अगदीच वेगळी असते! चार्वाकाने ज्याचे वर्णन केले आहे ती सर्जनशील कलाकृती हीच.

''अनुभव घेण्याची प्रत्येकाची क्षमता वेगळी असल्याने त्याचा आविष्कारही वेगवेगळा असतो. काही अनुभव इतके तीव्र आणि प्रखर असतात की शब्दाकारात प्रकट व्हायला ते तयारच नसतात. अधिक सशक्त अशा माध्यमांची ते मागणी करतात. असे सशक्त माध्यम जीवन हेच असते! जेव्हा जीवन हेच माध्यम बनते तेव्हा लेखक केवळ लेखक राहात नाही. तो मग राजकीय कार्यकर्ता बनतो, समाजसेवक बनतो किंवा संत वा ऋषी बनतो. त्याला त्याशिवाय गत्यंतर नसते.

''असे काही अनुभव असतात की ज्यांचा आविष्कार जीवन ह्या माध्यमातूनच होऊ शकतो. त्याउलट कधी काळी सवड मिळाली आणि भाववृत्ती जागी झाली तर तो लिहीलही. त्यामुळे त्याचे शब्द जीवनाचे रणांगण तुडवून येतील आणि तो मग शब्दकोशातील अर्थापेक्षा अधिक काहीतरी सांगून जाईल. प्रत्येक संवेदनशील माणसाला माध्यमाच्या मर्यादा जाणवतातच, पण कधी कधी त्या असह्य होतात आणि मग जीवनाच्या रणांगणात उतरण्यावाचून गत्यंतरच राहत नाही.

''राजकारण हे गुंडांचे राखीव क्षेत्र अशी अनेकांनी समजूत करून घेतली आहे. ते खरोखर तसे असेल तर त्याला तथाकथित सज्जनांची निष्क्रियताच कारण असते. दुर्जन आपल्यावर निष्क्रियतेचा आळ कधीच येऊ देत नाहीत! ना. गोपाळ कृष्ण गोखले आणि महात्मा गांधी याच दृष्टीने राजकारणाचे अध्यात्मीकरण

करण्याचा विचार मांडत असत. आज गुन्हेगारीचे राजकीयीकरण होते आहे की काय, अशी शंका घेतली जाते. गोखले-गांधी हे राजकारणाच्या अध्यात्मीकरणाबद्दल बोलतात तेव्हा त्यांना आपले परंपरागत, परलोकपरायण अध्यात्म अभिप्रेत नसते, ही गोष्ट उघड आहे. राजकारणाला मूल्यांची दीक्षा देण्याच्या अर्थाने ते तो शब्द वापरतात. हे काम अर्थातच कलाकार आणि मुख्यत: साहित्यकार अधिक चांगल्या प्रकारे सुरू करू शकतील. पण हे आपल्याला जमणार नाही असे ज्यांना वाटते ते राजकीय जीवनाची घृणा करतात आणि दुसरीकडे आपल्या संस्थांत राजकीय हैदोस सुरू करतात! कालबाह्य मुद्दे तिथे आपल्याला सत्ता मिळावी म्हणून वापरतात! जात, धर्म, वंश यांचा उपयोग करताना त्यांना दिक्कत वाटेनाशी होते.

''दुनियेत दोन प्रकारचे लोक असतात. एक प्रकार अशा मंडळींचा असतो की जे दुनियेतील घाण पाहून वैतागून जातात आणि आपले डोळे गच्च मिटून घेतात. आणि दुसरे काही ती असह्य घाण नाहीशी करण्याच्या कामी स्वत:ला खपवतात. व्यक्तिगत मुक्तीने त्यांना समाधान मिळत नाही. घाणीतून जगाची सुटका व्हावी म्हणून ते धडपडत राहतात. या दृष्टीनेच रवींद्रनाथांनी आपल्या एका कवितेत म्हटले आहे, ''जुक्त करो हे शबारसंगे, मुक्त करो हे बंध। शंचार करो शकल कर्मे, शांत तोमार छंद।।'' सर्वांशी मला जोड, कारण बंधमुक्त होण्याचा तोच एक मार्ग आहे. असे होईल तेव्हाच तुझा शांत रस अंगप्रत्यंगातून संचारल्याचा आनंद मला मिळेल.''

यदुनाथजींच्या सर्व लेखनप्रक्रियेमागे हेच चिंतन होते. अज्ञान, अंधश्रद्धा, दारिद्र्य इत्यादींतून या समाजाची सुटका व्हावी यासाठी त्यांचे मन सतत धडपडत असायचे.

राजकारण सर्वथा निषिद्ध मानून त्यांनी स्वत:ला त्यापासून दूर ठेवले नाही. प्रत्यक्षत: ते कुठल्याही पक्षीय राजकारणात उतरले नाहीत पण प्रत्येक पक्षाच्या ध्येयधोरणावर, देशातल्या राजकीय घडामोडींवर त्यांचे फार बारीक लक्ष असायचे; आणि वेळोवेळी त्यांचे त्यावर मतही प्रसिद्ध व्हायचे.

त्यांच्या या जाणतेपणाविषयी प्रा. सुनीती देव यांनी लिहिलेय, ''राजकारणात काकांचा सक्रिय भाग नसतो, पण एखाद्या मुत्सद्दी राजकारणी व्यक्तीएवढेच ते त्या क्षेत्रात वाकबगार आहेत. मला आठवतंय, मूर्तिजापूरच्या तिडके कुटुंबीयांनी आयोजित केलेल्या व्याख्यानमालेचे पहिले पुष्प काका गुंफणार होते. मी ते

व्याख्यान ऐकायला मूर्तिजापूरला गेले होते. विषय 'युवावर्ष' होता. निवडणुकीचे वारे होते. काकांनी सद्य:राजकारणावर टोले हाणीत अतिशय सुरेख रीतीने विषय मांडला. त्यांचा '२६ जून' हा आणीबाणीच्या संदर्भात इंदिरा गांधींवरील लेखही त्यांच्या राजकारणाविषयीच्या ज्ञानाची खात्री पटविणारा आहे. आजही त्या लेखाचे कात्रण मी माझ्या संग्रही जपून ठेवले आहे.'' 'साधने'तून त्यांनी वेळोवेळी सद्य:राजकारणावर केलेल्या टिपणांचा संग्रह कधी प्रकाशित झाला तर त्यांची राजनीतीविषयीची समज किती गहरी होती याचा प्रत्यय येऊ शकेल.

## समतोल राष्ट्रवादी

यदुनाथांची सगळी पिढीच प्रखर राष्ट्रवादी होती असे म्हणायला हरकत नाही. राष्ट्रवादाची ज्याची त्याची मर्यादा व समज कमी-जास्त असणार हे तर उघडच आहे. विशेषत: 'हे राष्ट्र माझे आहे' असे म्हणताना या राष्ट्रातील सर्व जातिधर्मांविषयी व त्यातल्या लोकांविषयी म्हणणाऱ्याच्या मनात समान सद्भाव असतोच असे नाही. यदुनाथजींच्या मनात सर्वांविषयी सद्भाव तर होताच पण त्या त्या जातिधर्माच्या किंवा गटांच्या दोषांची व मर्यादांचीही स्पष्ट जाणीव होती. त्यात भाबडेपणा नव्हता. उदाहरणार्थ, मुस्लीम समाजात परिवर्तनाची चळवळ उभी राहावी यासाठी व्यक्तिश: त्यांनी खूप प्रयत्न केले. त्याच दृष्टिकोणातून हमीद दलवाईंची चळवळ उचलून धरली. 'सकाळ'मधून ते मुस्लीम समाजाशी संबंधित असलेल्या प्रश्नांवर सतत छोटी छोटी टिपणे लिहीत. हीच टिपणे पुढे त्यांच्या 'तवारीख' या ग्रंथामध्ये संग्रहित झाली. महाराष्ट्रातल्या अन्य कुणाही पत्रकाराने इतक्या सातत्याने मुस्लीम समाजाच्या प्रश्नाविषयी लिहिलेले नाही. एखाद्या प्रश्नाची सखोल पुराव्यासहित चर्चा या टिपणांमध्ये नाही. मुस्लीम समाजात आज जी सामाजिक आंदोलने उभी राहत आहेत; त्यांच्या मनात जे अनेक प्रश्न खदखदत असतात, त्याकडे मराठी माणसाचे लक्ष वेधावे एवढाच त्या लेखनाचा हेतू आहे. पण ती लिहिताना यदुनाथजींनी कुठेही मुस्लीम समाजाला अनावश्यक झुकते माप दिलेले नाही. तलाक, दहेज, बारात, सामूहिक लग्नपद्धती, बोहरा समाजातील चालीरीती, सैय्यदनासाहेबांचा वरचश्मा, पाकिस्तानातल्या व बांगला देशातल्या निवडणुका, जमाते इस्लामीचे प्रचारतंत्र, लोकसंख्या नियोजन, वक्फच्या पैशाचा गैरव्यवहार इत्यादी अनेक बाबींविषयी त्यांनी फार स्पष्टपणे लिहिले. मुस्लीम समाज व त्याच्या मान्यता जशा आहेत तशाच मांडण्याचा हा साहसी प्रयत्न होता. गंमत म्हणजे 'इस्लामी संस्कृती' हे पुस्तक लिहिताना पू. साने गुरुजींची ही भूमिका

नव्हती. त्यांना ती संस्कृती जशी जाणवली तसे त्यांनी तिचे चित्रण केले. इतिहास म्हणून तो गृहीत धरता येत नाही. पण 'तवारीख'च्या लेखकाला इतिहासाचे व वास्तवाचे भान आहे. प्रा. नरहर कुरुंदकर लिहितात, ''चिकित्सेचे सर्व दरवाजे मोकळे ठेवणारे अनाग्रही मन आणि विचारपूर्वक स्वीकारलेल्या श्रद्धांना आग्रहाने जीवनात राबवणारे मन या दोन्हींचा समन्वय त्यांच्या ठिकाणी झालेला दिसतो. काही काही मुद्द्यांच्या बाबतीत त्यांच्या भूमिका आश्चर्यकारक वाटण्याइतक्या स्वच्छ व तर्कशुद्ध असतात याचे कधी कधी मला फार नवल वाटते.''

'संघ परिवारातील मंडळींच्या विचारासाठी' या शीर्षकाचा एक लेख 'भारत जोडो यात्रे'नंतर यदुनाथांनी लिहिला होता. ते स्वतःच्या विचारसरणीत किती तर्कशुद्ध व स्पष्ट होते याचे हा लेख एक उत्तम उदाहरण ठरेल. यदुनाथ लिहितात, ''धर्माधारित राष्ट्र बनवू पाहणारे कोणत्या तोंडाने खलिस्तानला विरोध करतील? शीख हे हिंदूच आहेत असा हिंदूंनी कंठशोष करून फायदा नाही. शीख तसे म्हणण्याच्या मनःस्थितीत आहेत काय? धर्मग्रंथातील वचने उद्धृत करून उपयोग नाही, कारण गुरुद्वारात रोज, 'मानस की जात सब एक पहिचान यो' म्हणणारे पंजाबातील निरपराध्यांची हत्या थांबवण्याला असमर्थ ठरले आहेत हे स्पष्ट दिसत आहे आणि संघापेक्षाही कडवे हिंदुत्ववादी पंजाबबाहेरील शिखांना ज्या पद्धतीने वागवत आहेत त्याच्या किंकाळ्या अजून आकाशात निनादत आहेत.''

सगळा लेख अतिशय स्वच्छ व तर्कशुद्ध विचारांनी युक्त आहे. 'सा. देशदूत'मधून काँग्रेस पक्षावर त्यांनी अशीच परखड टीका केली होती.

''स्वातंत्र्यलढ्यात तावूनसुलाखून निघालेल्यांची संख्या क्रमाक्रमाने कमी होत जाणे ही अटळ नियती होती. तसतसा काँग्रेसचा कस कमी होऊ लागला. ध्येयासक्त मंडळींना मागे सारून पोटासाठी मंडळी कपट-कारस्थाने करून पुढे सरसावू लागली. सत्ता हे एकच दैवत बनले. सत्ता कशासाठी याचे जणू विस्मरण झाले. काँग्रेसची संघटना शिथिल आणि निष्क्रिय बनू लागली तसतशी नोकरशाही वरचढ होऊ लागली. सरकारी कार्यक्रम हा आपलाच कार्यक्रम आहे असे काँग्रेसजन मानू लागले आणि त्या कार्यक्रमाची अंमलबजावणी मात्र नोकरशाहीच्या हाती गेली. नोकरशाहीतील बहुसंख्य मंडळींना ज्या सवयी लागल्या होत्या त्या दिरंगाई, खोटेपणाच्या व लाचलुचपतीच्या होत्या.''

पुढे याहीपेक्षा कठोर शब्दांत काँग्रेस पक्षाने मतांसाठी केलेल्या 'तडजोडीं'चा पंचनामा करीत त्यांनी या सर्वांत मोठ्या राजकीय पक्षाला सुनावले होते,

''आत्मपरीक्षण करून नवी पावले टाकाल अशी आशा करूया. कारण कॉंग्रेसवर केवळ कॉंग्रेस पक्षाचेच नव्हे तर देशाचेही भवितव्य बऱ्याच प्रमाणात अद्याप तरी अवलंबून आहे.''

आत्मपरीक्षणाची ही वेळ दुर्दैवाने कधी आली नाही. हळूहळू या पक्षाचे क्षरण होऊन त्याचे तुकडेही पडले. केंद्रवर्ती सत्ताही हातातून गेली. यदुनाथजींचे निरीक्षण खरे ठरले.

✳

# पणती जपून ठेवा

यदुनाथ स्वभावाने संत होते. 'यती' हे त्यांना मिळालेले विशेषण सर्वार्थाने योग्य आहे. कुठल्याही अन्यायाच्या विरुद्ध संघर्ष करण्याची पाळी आली की एरव्ही अगदी साधे, सरळ वाटणारे यदुनाथ एकदम पोलादाच्या कांबीसारखे होत. त्यांना वाकवणे, मोडणे मोठमोठ्या शक्तींनाही शक्य होत नसे. एरव्ही व्यक्तिगत व सामाजिक जीवनात ते कमाल साधेपणाने वावरत. त्यांचे व्यक्तिमत्त्व पारदर्शी होते. ज्यांना ज्यांना म्हणून जी जी मदत करता येईल ती ती ते अगदी तत्परतेने पण मूकपणे करीत. त्यांच्या देशभरच्या ओळखींचा त्यांना या कामासाठी उपयोग व्हायचा. अनेक व्यक्ती, अनेक संघटना व अनेक उपक्रमांना मदत मिळावी म्हणून यदुनाथ कुणाकुणाला पत्रे लिहीत, निरोप देत. त्यांच्या त्या पत्रांमधे किंवा निरोपांमुळे संबंधित व्यक्तीपर्यंत ती मदत पोहचतही असे.

कधी कधी वाटे की यदुनाथांना सामाजिक मनच आहे. व्यक्तिगत आशा, आकांक्षा, काळज्या, चिंता यांपासून ते बहुतांशी मुक्त दिसायचे. कुठल्याही व्यक्तिगत अडीअडचणींविषयी किंवा घरगुती प्रश्नांविषयी त्यांना चर्चा करताना मी कधीही पाहिले नाही. रात्रंदिवस या समाजसेवकाच्या मनात समाजाचाच विचार असायचा.

आश्चर्य असे की कितीतरी घरांमधल्या अगदी अंतरंग प्रश्नांविषयी यदुनाथांना माहिती असायची. लहान-मोठी कितीतरी माणसे त्यांना त्यांच्या घरच्या प्रश्नांविषयी लिहीत आणि त्यांच्याकडून अगदी खराखुरा पण स्पष्ट सल्ला प्राप्त करीत. पण चुकूनसुद्धा यदुनाथ एका घरातला दोष दुसऱ्या घरात सांगत नसत. त्यांच्या मनात

वेगवेगळ्या प्रश्नांच्या गराड्यात अडकलेल्या या घरांविषयी व त्यांच्यातल्या लोकांविषयी अपार करुण असायची.

आपल्या अफाट लोकसंग्रहातील सर्वांची मने ते कसे सांभाळत हे त्यांचे त्यांनाच माहीत. गंमत अशी की प्रत्येकाला ते आपलेच आहेत असे वाटे आणि त्याचे ते वाटणे अजिबात चुकीचे नसायचे.

समाजाशी असलेल्या या अद्वितीय बांधिलकीमागे आणखी एक सूत्र होते. हा समाज बदलायचा असेल तर मोठ्या धैर्याने व साक्षेपाने त्याचे विचारपरिवर्तन करण्याचा मार्ग चोखाळायला हवा असे त्यांना वाटे. समाजप्रबोधनाच्या या प्रक्रियेवर त्यांचा पूर्ण विश्वास होता आणि वैचारिक पातळीवर असे काम करणाऱ्या सर्वांविषयी त्यांच्या मनात खूपच स्नेह असायचा. समाजप्रबोधनाविषयीची ही जागृत जाणीव त्यांच्या मनात मुख्यतः साने गुरुजींच्या सहवासामुळे व राष्ट्रसेवादलाच्या कार्यातून रुजली. राजकारण, समाजकारण व साहित्यकारण या तिन्ही क्षेत्रांतल्या विश्वप्रसिद्ध असलेल्या लोकांमधे यदुनाथांचा वावर होता. हा वावर इतका सहज स्वाभाविक असायचा की प्रत्यक्षतः तो पाहिल्यावरच त्याची कल्पना करता येणे शक्य व्हायचे. कुणाही मोठ्या व्यक्तीचे कुठलेही दडपण यदुनाथांवर येत नसे. एक स्वयंप्रज्ञ, प्रखर आत्मविश्वासी, निःस्पृह, निर्भय आणि मुख्यतः निर्वैर मनोवृत्ती त्यांना लाभली होती.

## योद्धेपण

हा संस्कार विनोबांचा होता. विनोबांच्या प्रखर बुद्धीचे, विलक्षण तर्कशक्तीचे आणि निर्भय वैचारिकतेचे त्यांना आकर्षण वाटे. मी अनेकदा त्यांच्या तोंडून विनोबांच्या बुद्धिचातुर्याचे किस्से ऐकले. पण वेळ आली तेव्हा यदुनाथांनी विनोबांचा विरोध करण्याससुद्धा कुचराई केली नाही. किंबहुना याच मनोवृत्तीमुळे असेल पण सर्वत्र अगदी मवाळपणे संचार करणाऱ्या यदुनाथांमधे एक सदैव सज्ज असलेला योद्धा दडलेला आहे असे भासे. अगदी साध्या प्रसंगातूनसुद्धा त्यांचे हे 'योद्धेपण' प्रकट व्हायचे. असाच एक प्रसंग खुद्द विनोबांच्या आश्रमात विनोबांसमवेतच घडला होता. आचार्य परिषदेची बैठक वर्ध्याला होती. संयोजक आचार्य गुरुशरण यांनी या बैठकीचे निमंत्रण यदुनाथांनाही दिले.

वर्ध्यात दाखल झाल्यावर त्यांनी प्रथमतः पवनारला जाऊन विनोबांची भेट घेतली.

'तू इथे कसा?' विनोबांनी विचारले.

'ते तुम्ही निमंत्रक गुरुशरण यांना विचारा. त्यांनी निमंत्रण दिले आहे.'

'तू निर्भय, निर्वैर व निःपक्ष आहेस का?' विनोबा.

'माझ्या निर्भयतेबद्दल शंका असू नये. निर्वैरतेबद्दलही शंका घेण्याचे कारण नाही. निःपक्षतेबद्दल विचाराल तर ते ठरवायचे कोणी?' यदुनाथ.

'स्वतःच.' विनोबा.

'मी निःपक्ष आहे. कारण स्वातंत्र्योत्तर काळात मी कधी कोणत्याही पक्षाचा सभासद झालो नाही. अगदी सर्वोदय समाजाचादेखील.' यदुनाथ.

'प्रो.जे.पी., ॲन्टी इंदिरा असे काही आहे की नाही?' विनोबा.

'प्रो.जे.पी. मी आहे कारण जे.पी. न्यायाच्या, सत्याच्या, लोकशाहीच्या बाजूने उभे आहेत आणि त्यामुळे माझ्या निःपक्षतेला बाधा येत नाही.' यदुनाथ.

नानासाहेब गोरेंनीदेखील विनोबांना हा प्रश्न विचारला होता की 'हे निःपक्ष काय प्रकरण आहे? सत्य पक्षाच्या बाजूने उभे राहिले पाहिजे. असत्याशी वैर केले पाहिजे. चांगल्याचा पक्ष घेतला पाहिजे.' विनोबा म्हणाले, 'हे ठरवायचे कुणी?'

नानासाहेबांचे उत्तर होते, 'तुम्ही ठरवा. इंदिराबाईंचा पक्ष सत्पक्ष आहे असे वाटत असेल तर सरळ त्यांच्या बाजूने उभे राहिलात तरी चालेल.'

हेच मत यदुनाथांचेही होते. तत्त्वासंबंधी ते कुणाशीही कुठलीही तडजोड स्वीकारत नसत.

### अपमान स्वीकारू नका

एकदा एस.टी. तून आमचा पुणे-धुळे प्रवास चालू होता. वेगवेगळ्या विषयांवर गप्पा सुरू होत्या. एक्सप्रेस असलेली ती बस मनाला येईल तेथे ड्रायव्हर थांबवायचा. तो व कंडक्टर लहर लागेल तेथे चहा-पाणी घ्यायचे. प्रत्येक स्टँडवरही बराच वेळ जायचा. इतर प्रवाशांमधे चुळबूळ सुरू होती. आपापसात ड्रायव्हरला लाखोली वाहण्याचे कामही काहींनी तत्परतेने केले. मालेगावला गाडी येईपर्यंत शांतपणे बसलेल्या यदुनाथांनी स्टँडवर गाडी पोहचताच ड्रायव्हरकडे तक्रारबुकाची मागणी केली. त्यांचा बावळा वेश बघून आधी तर त्यांना धुडकावून लावण्याचाच प्रयत्न केला. पण ते 'महाराष्ट्राचे मोठे पत्रकार आहेत' असं मी सांगितल्यावर थोडा वरमला. मात्र गाडीत तक्रारबुक नव्हते. 'नाही तर नवे आणा आणि तेही नसेल तर स्टँड कंट्रोलरला बोलवा. तोपर्यंत गाडी पुढे जाणार नाही.' यदुनाथांनी ठाम भूमिका घेतली. गाडीचा खोळंबा होत होता. आतापर्यंत ड्रायव्हर-कंडक्टरला दूषणे देणारे पॅसेंजर आता भूमिका बदलून 'जाऊ द्या हो, कुठे कटकट

वाढवता? अशाने ते सुधारणार आहेत का?' असे म्हणायला लागले होते. शेवटी स्टँड कंट्रोलर आला. त्याने मध्यस्ती करून यदुनाथांची माफी मागितली. तरी त्यांचे शेवटपर्यंत मागणे एकच होते. 'गाडीत तक्रारबुक हवे. ते का नाही? आणि नसले तर या गाडीचा नंबर टाकून नवे आणा.' शेवटी ड्रायव्हरने तक्रारबुक दिले. यदुनाथांनी त्यात सर्व प्रवाशांच्या वतीने सविस्तर तक्रार नोंदवली व खाली स्वत:ची सही केली. मीही केल्यानंतर बहुसंख्य प्रवाशांनी केली.

यदुनाथजींचे म्हणणे होते, 'जनता म्हणून आपण असंख्य लहान-मोठे अपमान गप्प बसून सोसत असतो. याने समाजाला वळण कसे लागेल? कर्मचाऱ्यांना कर्तव्याची जाणीव करून द्यायची असेल तर जनतेला स्वत:चे हक्क कसे वापरायचे याचेही ज्ञान करून द्यावे लागेल.'

भोपाळच्या स्टेशनवर असेच त्यांनी तेथल्या स्टेशनमास्तरला फैलावर घेतले होते आणि तिथल्या तक्रारबुकातही तक्रार नोंदवली होती.

इतरांना कर्तव्याची जाणीव करून देणारे यदुनाथ स्वत:च्या कर्तव्यपालनात किंचितही हयगय करीत नसत. त्यासाठी पडेल ती किंमत द्यायची त्यांची तयारी असे. त्यांच्या उक्ती आणि कृतीत एक ठाम आत्मविश्वास असे. असा आत्मविश्वास फार थोड्यांमधे आढळतो. विशेष म्हणजे या आत्मविश्वासाला अहंकाराचा स्पर्शसुद्धा नसे. ओळखीचा माणूस भेटो की अनोळखी ते त्याच्याशी मोकळेपणाने बोलत.

एकदा माझा चुलत भाऊ गिरीश एस.टी.ने औरंगाबादहून धुळ्याला येत होता. त्या गच्च भरलेल्या बसमधे यदुनाथही होते. अर्ध्या-पाऊण तासाने गिरीशनेच त्यांची ओळख काढली. त्यांना ओळखायला थोडा वेळ लागला. पण मग 'अरे, तू कांतीलालजींचा मुलगा नं? मग इतक्या लांब कशाला बसलास?' असं म्हणत त्यांनी त्याला आपल्या जवळ बसवून घेतले व थेट धुळ्यापर्यंत मनसोक्त गप्पा मारल्या.

## जीवनावर प्रेम

पण या कर्तव्यकठोर माणसाचे जीवनावर नितांत प्रेम होते. जे जे काही सुंदर, सरळ आणि निष्पाप असेल ते ते त्यांना सुखावत असे. लहान मुलांमधे त्यांना रमताना पाहिले की याचा प्रत्यय येई. आपण होऊन ते लहान मुलांच्या घोळक्यात मिसळत. त्यांना अगदी रंगून गोष्टी सांगत. त्यांच्याबरोबर खेळत. त्यांच्या डब्यात जेवतही. 'आंतरभारती'च्या सर्व बालमेळाव्यांना त्यांची त्यामुळे पूर्णवेळ उपस्थिती

असायची.

यदुनाथांचे जीवनावर प्रेम होते आणि साधेपणाने जगायचा वसा घेतला होता म्हणून ते इतरांपेक्षा वेगळे भासत. पण आपले साधेपण, त्याग, देशसेवा, संपादकत्व इत्यादी कशाविषयी ते बोलत नसत. त्याचा टेंभा मिरविण्याचा तर प्रश्नच नव्हता. मात्र आपल्याला एक निरामय आयुष्य जगायचे आहे असे त्यांनी निश्चितपणे ठरवले असावे. त्यामुळे त्यांच्या जीवनविषयक गरजा कमालीच्या कमी होत्या. सांसारिक गरजा पार पाडण्याचे काम त्यांनी अवश्य केले पण त्याच्या गुंत्यात ते अडकले नाहीत. आचार, विचार व वेशभूषा या सर्व बाबतीत साधेपणा आणि सरळपणा हेच त्यांचे मुख्य निकष असायचे.

ते एकदा 'लोकसत्ता'चे संपादक श्री. माधव गडकरी यांना भेटायला त्यांच्या कार्यालयात गेले. गडकरींच्या टेबलावर लिहिण्यासाठी उंची कागदांची एक चळत ठेवलेली होती. यदुनाथांना ते कागद पाहूनच आश्चर्य वाटले. 'लिहिण्यासाठी येवढे उंची कागद कशाला लागतात?' त्यांनी गडकरींना विचारले.

यदुनाथ कुठल्याही पाठकोऱ्या कागदावर लिहीत. किंबहुना मी त्यांचे बहुतेक लिखाण कुठकुठल्या पाठकोऱ्या कागदांवर असलेलेच पाहिले आहे. कागदाचा साधा कपटाही ते वाया घालवीत नसत.

## सद्शक्तीचे अस्तित्व आहे

ईश्वर, मूर्तिपूजा, धर्म वगैरे गोष्टी न मानणारे यदुनाथ एका सर्वोच्च सद्शक्तीचे अस्तित्व मात्र मानत होते. माणसाच्या चांगुलपणावर त्यांची श्रद्धा होती आणि जे जे काही मंगल असेल ते ते त्यांच्या दृष्टीने स्वागतार्ह होते. धर्मातल्या कर्मकांडावर आणि अंधश्रद्धांवर त्यांचा वैचारिक हल्ला तिखट व मार्मिक असे. पण त्यात कुठलीही कटुता नसायची. अन्य धर्म व धर्मीयांचा अपमान करण्याचा विचारही त्यांना कधी स्पर्श करीत नव्हता. किंबहुना वेगवेगळ्या जातिधर्मातील असंख्य लोक यदुनाथांना मानीत.

गांधी, विनोबा आणि साने गुरुजी ही त्यांची दैवते होती आणि त्यांच्याविषयीची अपार श्रद्धा त्यांच्या मनात होती. सचोटी, साधेपणा, सत्यप्रियता, करुणा, व्यापक सद्भाव या गोष्टींचा वारसा त्यांनी या तिघांपासूनच उचलला होता.

या तिघांप्रमाणे यदुनाथही गृहस्थ असूनही परिव्राजक होते. देशभर त्यांची भ्रमंती असे. ते कुठल्याही वाहनाने विनातक्रार प्रवास करीत. साने गुरुजींसारखेच भर गर्दीत जमेल तेवढी जागा करून इतरांना जवळ बसवून घेत. त्यांच्या

खाण्यापिण्याच्या सवयीही कमालीच्या साध्या होत्या. जे ताटात असेल ते आवडीने खात. जास्तच आग्रह झाला तर तक्रार न करता खाऊन टाकत. मात्र कधीही कुणाच्याही स्वयंपाकाला नावं ठेवत नसत.

यदुनाथजींचं घर येणाऱ्या-जाणाऱ्यांनी सतत गजबजलेले असे. तसे ते घरी फारच थोडे दिवस थांबत. एकार्थाने घराचा सगळा भार आ. जान्हवीताईंवरच होता. सुहिता आणि मिहिर ही दोन मुलं काळाबरोबर वाढत गेली. त्या दोघांबरोबर मन:पूत खेळायला हवा तेवढा वेळ त्यांना मिळाला नाही. कालक्रमानुसार या मुलांचे संसारही वाढले, बहरले, पण आपल्याला आपल्या वडिलांचा हवा तेवढा आणि हवा तसा सहवास मिळाला नाही, याची एक खंत त्यांच्या मनात असावी.

मात्र आपल्या नातवंडांसोबत खेळायला यदुनाथांना कधी कधी मनसोक्त वेळ मिळायचा व ते त्याचा भरपूर आनंद घेत.

## युवा पिढीवरचा विश्वास

यदुनाथजींसारखी माणसं बहुधा सर्व समाजासाठीच असतात. त्यांच्यासारख्यांच्या जीवनात व्यक्तिगत, खाजगी असं बहुधा काही राहातच नाही. जे काही असतं ते साऱ्या समाजासाठी असतं. त्यांच्या आचार, विचार आणि व्यवहारात 'समाज' हाच प्राधान्याने असतो. यदुनाथजींच्या बाबतीतही तेच होते. त्यामुळे त्यांचे 'खाजगी काम' असे काही नसायचेच.

युवा पिढीवर अखंड विश्वास ठेवणारी पुष्कळ माणसे भेटतात. पण त्या सर्वांना या पिढीतला अभिक्रम जागवता येतोच असे नाही. तिला प्रेरित करतील असे कार्यक्रम देणे तर अगदीच थोड्या लोकांना जमते. यदुनाथांचा युवा पिढीच्या कर्तृत्वावर अपार विश्वास तर होताच, पण मनापासून प्रेमही होते. त्यामुळे ते युवा पिढीची मानसिकता बरोबर जोखत. प्रत्येकासाठी त्याच्या लायकीचे काम त्यांच्याकडे असे आणि एकाच वेळी सर्व समूहाची प्रेरणा जागवणे व त्यांना एखाद्या कार्यासाठी उद्युक्त करणे त्यांना सहजी जमत असे.

''एवढा शंभर कोटींचा देश भ्रष्टाचारासंबंधी एखाद्या करमणुकीच्या कार्यक्रमाप्रमाणे तटस्थपणे बोलतो आणि भ्रष्टाचाराला शिष्टाचार बनवून भ्रष्टाचार नष्ट करण्याचा कुणी उपाय उपरोधाने सुचवला तर त्याला मान डोलावतो याचा अर्थ काय?'' हा प्रश्न त्यांना बेचैन करीत होता. ''शंभर कोटींना असे अगतिकतेने घेरले तर कुणाच्या बळावर देशाच्या उज्ज्वल भविष्याची आशादायक स्वप्ने रंगवावीत?'' असा प्रश्न त्यांना सतत पडला असला तरी ते हत्यार टाकून

स्वस्थपणे बसून राहणाऱ्यांपैकी नव्हते. 'वन्ही तो चेतवावा रे' असा निर्धार करून ते भेटलेल्या प्रत्येक व्यक्तीतला अभिक्रम जागवण्याचा प्रयत्न करीत.

सामूहिक कृतीत व्यक्तीची सर्जनशीलता कशी जतन करता येईल हा एक गुंतागुंतीचा प्रश्न नव्या पिढीपुढे सतत असतो. बाबा आमटे, यदुनाथ, सुब्बाराव यांच्याकडे या प्रश्नाचे उत्तर होते. त्यामुळे तरुण पिढीशी या तिघांचे अगदी वेगळे नाते होते व आहेही. यदुनाथ कधीही कटू बोलत नसत. वेळ पडली तर स्पष्ट बोलत पण ते बोलणेही एका मर्यादेत असे. त्यांचे एखादे सूचक वाक्य त्यांची नाराजी किंवा असहमती स्पष्ट करीत असे. अनिंदेचे तर त्यांनी जणू व्रतच घेतले होते. कितीतरी वर्षं मला त्यांच्यासोबत राहाता आले, फिरता आले. पण मी कधीही कुणा व्यक्तीसंबंधीची निंदा त्यांच्या तोंडून ऐकली नाही. कुणाच्या चारित्र्यहननाचा तर ते विचारही करीत नसत.

## निरंतर कार्यमग्न

निरंतर कार्यमग्न राहण्याचा वसा गांधी, विनोबा, साने गुरुजींकडून यदुनाथांकडे आला होता. विनोबा तर म्हणायचे की जर मला गांधीजींनी बाहेर काढले नसते तर मी मजूरवर्गातच कुठेतरी राहिलो असतो. या तिघांना कठोर शारीरिक श्रमाची सवय होती. स्वत:ची कामे स्वत:च करण्याचा यदुनाथांचा अट्टाहासही त्याच वृत्तीत मोडत होता. आपल्या गरजा कमीतकमी ठेवणे या सर्वांना शक्य झाले होते. यदुनाथजींकडे मुख्य वजन असायचे ते पुस्तकांचे. कपडे नाममात्र व गरजेपुरतेच असायचे आणि अन्य काही अनावश्यक वस्तू सोबत ठेवण्याचा प्रश्न त्यांच्याबाबतीत संभवतच नव्हता. खाण्यापिण्याच्या बाबतीत कुठलाच चोखंदळपणा त्यांच्यात नसायचा. जे ताटात असेल ते मुकाट्याने खात. नको असेल तर आधीच काढून ठेवीत. इतरांनी ताटात उष्टे टाकलेले त्यांना आवडत नसे. स्वत: कधीही उष्टे टाकीत नसत.

प्रा. नरहर कुरुंदकर यदुनाथांना खूप मानत व यदुनाथांचाही त्यांच्यावर अपार लोभ होता. यदुनाथांमुळेच माझा कुरुंदकरांशी घनिष्ठ परिचय झाला. सोमनाथच्या पहिल्या दोन-तीन छावण्यांत त्यांच्याशी फार मोकळेपणाने गप्पा करता आल्या. जे.पी., एस.एम. आणि कुरुंदकरांच्या जाण्यामुळे मात्र यदुनाथ मनातून फारच हेलावले होते. विशेषत: कुरुंदकरांचे असे अचानक जाणे त्यांना काय, सर्वांनाच अनपेक्षित होते.

यदुनाथांच्या जवळपासची बहुतेक सर्व माणसे राजकारणातच होती. एस.

एम., ग. प्र. प्रधान, भाई वैद्य, पन्नालाल सुराणा वगैरे. ते प्रत्यक्षात कुठल्याही पक्षीय राजकारणात नव्हते पण समाजवादी विचारांशी त्यांची बांधिलकी अगदी स्पष्ट व पक्की होती. समाजवादी दलाचे दुभंगणे त्यांना आवडले नव्हते. हे दोन्ही भाग एकत्र व्हावेत यासाठी त्यांचा सतत आग्रह असायचा. एकदा तर त्यांनी प्रसोपाच्या अधिवेशनासमोर या ऐक्यासाठी धरणेही धरले होते.

पण यापलीकडे जाऊन प्रत्यक्ष राजकारणात जाण्याची त्यांना इच्छा नव्हती. त्यांच्या स्वभावातही ते नव्हते. मात्र राजकारणाच्या उतार-चढावाचा त्यांचा अभ्यास सूक्ष्म होता. 'साधने'च्या अनेक अग्रलेखांमधून व वेगवेगळ्या वृत्तपत्रांतून वेळोवेळी लिहिलेल्या लेखांमधून या अभ्यासाचा प्रत्यय येतो. काँग्रेस पक्षाच्या शताब्दीच्या वेळी 'सा. देशदूत', 'दक्षिणयुग' व 'लोकराज्य'मधून यदुनाथांनी अनेक दीर्घ लेख लिहून या पक्षाची शक्तिस्थाने व दुर्बल स्थाने कुठली याची चर्चा केली होती. पंडित जवाहरलाल नेहरूंच्या जन्मशताब्दीच्या वेळी त्यांनी पंडितजींच्या राजकारणाची अशीच कठोर चिकित्सा केली होती. आपल्या या लेखात यदुनाथ म्हणतात, ''भारताचे प्रधानमंत्री झाल्यावर मधून मधून वेळ काढून आपल्या आत्मकथेचे नेहरूंनी वाचन केले असते तर त्यांचा कारभार झाला त्यापेक्षा कितीतरी चांगला आणि यशस्वी झाला असता!!''

हा विचार मुळीच अवाजवी नव्हता. पंडितजींच्या आत्मकथेत श्रमिकांचा कळवळा पानोपानी आढळतो. येथल्या शेतकऱ्यांची दुःखे ते जाणतात व त्या विषयी तळमळीने लिहितात. पण ज्या वेळेला पंचवार्षिक योजना आखली गेली त्या वेळी या दोन्ही गोष्टी गौण ठरल्या. कारखाने आणि भांडवलदार प्रमुख ठरले.

## आचार-विचारांची एकरूपता

यदुनाथांनी हिंदीत एक लेख लिहिला होता, 'विनोबा बनाम विनोबा'. त्यांचे प्रतिपादन असे होते : विनोबा-विचार आणि विनोबा-व्यक्ती यांच्यात जोपर्यंत एकरूपता होती तोपर्यंत प्रश्नच नव्हता. पण त्यांच्यात जेव्हा विरोध निर्माण झाला तेव्हा विनोबा-विचार आणि विनोबा-व्यक्ती याच्यातून एकाची निवड करण्याचा दुर्घट प्रसंग ओढवला आणि मग विनोबा-विचाराला विनोबा-व्यक्तीपेक्षा अधिक महत्त्व देणे भाग पडले. पंडितजींच्या बाबतीतही हेच झाले होते. परंपराप्रिय समाजाने व्यक्ती जवाहरलालचा उदोउदो केला पण यदुनाथ सतत जवाहरलालच्या विचारांच्या प्रकाशात त्यांना पारखत राहिले.

ते विनोबांचे भक्त होते पण या भक्तीत अंधश्रद्धेचा लवलेशही नव्हता.

किंबहुना विनोबांवरची त्यांची निष्ठा विनोबांसारखीच पूर्णपणे बुद्धिनिष्ठ होती. अवतारपूजक मनोवृत्तीचा त्यांना एरव्हीही कंटाळा येत असे.

सर्वोदय चळवळीला एक निश्चित दिशा मिळावी, सर्वोदयवाद्यांनी केवळ कल्पनेत विहार करीत राहू नये असे त्यांना प्रकर्षाने वाटे. भावनेला त्यांचा विरोध असण्याचा प्रश्नच नव्हता. कारण 'श्रद्धा आणि भावनेचा पाया बुद्धी हाच असतो' या विनोबांच्या वचनावर त्यांची श्रद्धा होती. त्यामुळे सामाजिक समतेसाठी केवळ शब्दांचे बुडबुडे उडवून उपयोग नाही, सर्वोदयी कार्यकर्त्यांनीसुद्धा संघर्षाला सतत तयार राहायला हवे असे त्यांनी निक्षून सांगितले. १६ नोव्हेंबर १९९२ च्या 'साम्ययोग'चा अंकात 'सर्वोदय-कार्याची नवी दिशा' या शीर्षकाने एक लेख लिहून त्यांनी अगदी स्पष्ट शब्दात सर्वोदयवाद्यांना बजावले...

## विचार-शासन हा आदर्श

''विचार-शासन हा सर्वोदयाचा आदर्श आहे. डोकी फोडून, सडकून नव्हे तर डोकी बदलून कारभार हा लोकशाहीच्या म्हणजे विचार-शासनाच्या दिशेने प्रवास असतो. त्याचे साधन असते लोकशिक्षण. परंतु लोकशिक्षण म्हणजे शब्द-व्यापार नव्हे. समजेपर्यंत समजावून सांगण्याचे अथक प्रयत्न करण्याची विनोबांची निष्ठा ही विचार-शासनाची द्योतकच म्हणावी लागेल. पण वाणीनेच समजावणे ही समजावण्याची मर्यादा काय म्हणून मानली जावी? समजेपर्यंत समजावण्याच्या कल्पनेत तीन दोष आहेत आणि त्या दोषांचा परिहार करावा लागेल. पटणे याची खूण केवळ मान डोलावणे ही असू शकेल काय? मान डोलावणारे जेव्हा प्रत्यक्ष रचना-परिवर्तनाला विरोध करू लागतात तेव्हा त्यांचे मान डोलावणे एक उपचार असू शकतो. प्रस्थापितांच्या कृतीचे समर्थन करणारेच अनेकदा वाचेने रचनापरिवर्तनाची भाषा वापरत असतात. त्यांना नवनिर्माणाच्या रणक्षेत्रात आणण्यासाठी वाणीने निषेध आणि कृतीने सत्याग्रह करण्याचा मार्ग अवलंबणे उचित नाही काय? 'स्वराज्यशास्त्रात' विनोबांनी या दोन्ही गोष्टींचा स्पष्ट उल्लेख केलेला आहे. परिवर्तनाच्या चळवळीत सर्वात मोठा धोका कोणत्या गोष्टीचा असेल तर दंभाचा असतो. दंभी माणसे सर्व चांगल्या गोष्टीचा उच्चार करून त्यापुढे 'परंतु' हे अव्यय जोडून आधीच्या सद्‌वचनावर पाणी फिरवतात! सद्‌वचनातून सदाचार उदयाला आला तरच ते सद्‌वचन कृतार्थ होऊ शकते. सद्‌वचनाचा उच्चार करताच माणूस मुक्कामावर पोचला की नाही याची तपासणी करणे चूक आहे, पण त्याच्या वाटचालीची दिशा ती आहे की नाही हे तपासणे आवश्यक आहे.

## संघर्षापासून पळू नका...

"रचनात्मक कार्य केवळ वाणीने तडीस जात नाही. रचनेने शब्द अनुप्रणीत होतात, प्रवाही बनतात आणि त्यांची समनुयोग क्षमता वाढते. तसे न झाले तर शब्द केवळ अक्षरांची रांगोळी ठरते! नवरचना म्हटली तर त्यात संघर्ष अनिवार्यपणे येतो. संघर्ष विध्वंसक आणि हिंसक होऊ नये एवढी दक्षता मात्र घ्यायला हवी. ती दक्षता घेतली की संघर्षाचे रूपच बदलते. संघर्ष हा उन्नत सहयोगच असतो. संघर्ष जेव्हा व्यक्तिगत महात्म्याने मर्यादित होतो तेव्हा त्याची शिक्षणक्षमता संपुष्टात येते आणि त्याला दैवी चमत्काराची कळा येते. त्यामुळे शिक्षणक्षम संघर्षाचा प्रारंभ व्यक्तिगत उपवासाने होऊ शकत नाही. शैक्षणिक प्रक्रियेत जास्तीतजास्त लोकांना सामील करून घ्यायचे असेल तर पुण्याईने प्रश्नांची सोडवणूक करणे गौण मानले पाहिजे. संघर्ष ही लोकशिक्षणाची प्रभावशाली प्रक्रिया आहे ही गोष्ट ध्यानी घेतली की प्रवचन करणारा श्रेष्ठ आणि संघर्ष करणारा तुच्छ असे समजता येणार नाही."

यदुनाथजींचे हे ठाम मत होते की रचना आणि संघर्ष यातील समतोल बिघडू न देता सर्वोदय कार्यकर्त्यांनी निरंतर कार्य केले पाहिजे. हे केले नाही तर विचार-शासन किंवा सर्वोदय हे केवळ स्वप्नरंजन ठरेल. यदुनाथ फार स्पष्टपणे बजावतात.

"संघर्ष शब्दाची ज्यांना ॲलर्जी असेल आणि त्या शब्दाच्या उच्चारामुळे ज्यांच्या अंगावर फोड येत असतील त्यांनी सर्वोदयाची वर्दी अंगावरून उतरवून ठेवणे चांगले! राज्यकर्त्यांपुढे शरणागती पत्करणे आणि समजेपर्यंत समजावत राहाणे यामध्ये फार मोठे अंतर आहे. मूठभर शासकांच्या राजी-इतराजींची चिंता सोडून रचना आणि संघर्ष यांच्या मदतीने समाजाच्या शब्दक्षमतेचा विकास करीत विचार-शासनाच्या दिशेने वाटचाल करीत राहणे ही सर्वोदयाची नवी दिशा होऊ शकते."

## निष्फळ मेळावे!

विधायक कार्याचा यदुनाथ फार वेगळ्या पद्धतीने विचार करीत याची आणखीही बरीच उदाहरणे देता येतील. १८-१९ जानेवारी १९८४ रोजी प्राचार्य मनोहर धोटे व निर्मला देशपांडे यांच्या पुढाकाराने जवळपास एक हजार विधायक कार्यकर्त्यांचा मेळावा नागपूरला झाला. हे कार्यकर्ते इंदिरा काँग्रेसला अनुकूल असलेले होते. मेळाव्यानंतर लगेच यदुनाथजींनी महाराष्ट्र टाइम्समध्ये 'विधायक कार्यकर्त्यांचा निष्फळ मेळावा' हा लेख लिहिला. ते लिहितात,

"हा हजार कार्यकर्त्यांचा जमलेला मेळावा पाहिल्यावर अनेकांना बत्तीस

सालची आठवण झाली. महात्मा गांधी त्या वेळी हरिजनांच्या कार्याने झपाटले होते; आणि केवळ हरिजनसेवेबाबत विचार करणाऱ्या सभांनाच जात. तेव्हा ते निमित्त करून एक सभा आयोजित करण्यात आली. त्याला खूप लोक जमले. इतके लोक पाहून गांधीजी हसत हसत म्हणाले, 'ओ हो हो! इतने हरिजन सेवा में दिलचस्पी लेनेवाले कार्यकर्ता! लगनवाले इससे आधे भी कार्यकर्ता होते तो अस्पृश्यता की समस्या कब से मिट गयी होती!' गांधीजींच्या या उद्‌गाराचे मर्म स्पष्ट आहे. खरीखुरी आच असलेले ४००-५०० कार्यकर्ते जरी इंदिरा काँग्रेसकडे असते तरी महाराष्ट्रातील इंदिरा काँग्रेसमध्ये वेगळे चित्र दिसले असते.''

## दोन सूचना

यदुनाथजींनी निर्मलाताई देशपांडे यांना दोन सूचना केल्या होत्या. एक, त्यांनी देशभर 'एक गाव एक पाणवठा' ही चळवळ हाती घ्यावी. कारण संविधानाने भलेही सर्वांना समान अधिकार दिले असोत, वा अस्पृश्यता पाळणे हा गुन्हा समजला जात असो, खुद्द इंदिरा काँग्रेसचा सर्वाधिक प्रभाव असणाऱ्या प्रदेशात म्हणजे उत्तर भारत, बिहार, राजस्थान, मध्य प्रदेशमध्ये अद्यापही अस्पृश्यता ठाण मांडून आहे. दुसरी, हरिजन सेवक संघाच्या कर्मचाऱ्यांचे पगार वाढवून द्यावेत. ते अगदी तुटपुंजे असून बँकेतल्या पट्टेवाल्यापेक्षाही कमी आहेत.

या त्यांच्या पत्राला उत्तरही मिळाले नाही. कार्यक्रम घेण्याचा प्रश्नच निर्माण होत नव्हता. नेमके विधायक कार्यक्रम नको असतील, ती करण्याची इच्छाच नसेल तर मग 'विधायक कार्यकर्ता' या शब्दाला तरी काय अर्थ असतो?

यदुनाथ आणखी एक मुद्दा मांडायचे. रचनात्मक काम करणारी मंडळी आश्रितासारखी का वागतात? ती स्वावलंबी असली पाहिजेत आणि त्यांना स्वाभिमानाने जगता यायला हवे. ती तशी नसतात म्हणून मोठमोठ्या सभा-समारंभाला पात्रता नसलेली माणसे मिरवून घेतात.

या दोन दिवसांच्या संमेलनात कुणालाही स्पष्ट मार्गदर्शन मिळाले नाही. एकही समाजोपयोगी कार्यक्रम ठरला नाही. या अशा मेळाव्यांचे फलित काय? इतक्या लोकांनी केलेल्या गर्दीला काय अर्थ असतो?

समाजपरिवर्तनासंबंधीची एकही गोष्ट बहुधा यदुनाथजींच्या नजरेतून सुटत नव्हती. कितीतरी घटना अशा असतात ज्यांच्याविषयी जागरूक नागरिकांनी निर्भयपणे आपली मते मांडली पाहिजेत. पण बहुसंख्य लोक या बाबतीत आळशी तरी असतात किंवा दुर्लक्ष तरी करतात.

सिनेअभिनेत्री नर्गीस दत्तच्या मृत्यूनंतर यदुनाथजींनी सप्टेंबर १९८१ च्या साप्ताहिक 'मनोहर'मध्ये तिच्या अंत्यसंस्कारानिमित्त उद्‌भवलेल्या वादाविषयी लिहिले होते, ''जन्माने मुसलमान असलेल्या नर्गिसचे मूळचे नाव फातिमा. सिनेमातले नाव नर्गिस. सुनील दत्तशी लग्न झाल्यानंतर ते झाले निर्मला. तिच्या मृत्यूनंतर तिच्या दोन भावांनी तिचे दहन करण्याऐवजी दफन करण्याचा आग्रह धरला व पुरेशी जागा उपलब्ध झाली नाही म्हणून तिच्या आईच्या थडग्यातच तिला पुरण्यात आले!''

नंतर कुणीतरी हा बूट काढला की लग्नाच्या वेळी ती जर हिंदू झाली होती व तिचे नाव निर्मला ठेवण्यात आले होते तर मुस्लीम पद्धतीने तिचे दफन केलेच का गेले? आणि ज्यांनी तिला सद्‌गती मिळावी म्हणून 'कुरान ख्वानी' केली त्यांनी तर इस्लामविरोधी महान पातक केले आहे. त्यांना सजा ठोठावण्यात यावी!

व्यक्ती मेल्यानंतरसुद्धा धर्माच्या नावाखाली समाज किती क्रूरपणे वागतो यासंबंधीची सर्व धर्मातली उदाहरणे देऊन यदुनाथांनी या प्रवृत्तीचा फार परखड शब्दांत समाचार घेतला होता.

## दुर्दम्य आकांक्षा

हा जड समाज आपण प्रयत्नपूर्वक बदलू शकू याबद्दल यदुनाथजींना प्रचंड आशा होती. ही आशा तरुणांवर असलेल्या त्यांच्या स्नेहापोटी आणि विश्वासापोटीच निर्माण झाली होती. अशाच अंधारलेल्या स्थितीतून जयप्रकाशांनी हा देश बाहेर काढला होता व दिल्लीत जनता पार्टीचे सरकार स्थापित केले होते. यदुनाथजी म्हणायचे, ''शब्दांचा स्पर्श जिभेला होणे म्हणजे संस्कार नव्हे. तर शब्दांचा स्पर्श मनाला, बुद्धीला व कर्माला होणे हा खरा संस्कार होय. आज सर्वत्र नैराश्येचा अहंकार दिसत असला तरी जनतेत चांगल्या मूल्यांची बूजही आहे. ती आपण वाढविली पाहिजे. सगळा अंध:कार आपण नाहीसा करू शकणार नाही. परंतु मिणमिणती पणती बनून आपल्याभोवतीचा अंधार निश्चित दूर करू शकू.'' याच विचाराने प्रेरित होऊन त्यांनी आपल्या कार्याची व आयुष्याची दिशा निश्चित केली होती.

## साठ वर्षे पूर्ण

यदुनाथजींच्या वयाला साठ वर्षे पूर्ण झाली १९८१ साली. 'साधने'चे काम करता करता जवळपास ३०-३१ वर्षे उलटून गेली होती. 'चांगल्याचा शोध घेण्याची पत्रकारिता' रुळविण्याचे श्रेय महाराष्ट्राने नि:संकोचपणे 'साधने'च्या पारड्यात

टाकले होते आणि यदुनाथजी या श्रेयाचे सर्वांत मोठे धनी आहेत याविषयीही कुणाचे दुमत नव्हते. तरी पण 'साधने'च्या अंतर्गत व्यवस्थापनात काही निर्णय झाले असावेत आणि यदुनाथांनी ठरवले की, ''आपण 'साधने'तून निवृत्त व्हावे आणि आठ-दहा वर्षे हिंडण्या-फिरण्याचे बळ आहे तोवर 'आंतरभारती'साठी फिरता आले तर फिरावे. सर्व विश्वस्तांच्या संमतीने मी निवृत्त झालो.'' त्यानंतर त्यांच्याशी झालेल्या गाठीभेटीत 'आंतरभारती' हाच मुख्य विषय असायचा.

'कथामाले'चे जनक प्रकाशमाई मोहाडीकर हे यदुनाथांचे जवळचे मित्र. त्यांच्या मनात यदुनाथांची एकसष्ठी साजरी करण्याचे आले आणि आपल्या स्वभावानुसार त्यांनी ते कार्य सहज पारही पाडले. प्रकाशभाईंच्या शब्दांतच सांगायचे तर–

''त्यांचा साठावा वाढदिवस साने गुरुजी कथामालेने पुढाकार घेऊन मुंबईत साजरा केला. त्या वेळी त्यांचे सहकारी चंद्रकांत शहा यांनी 'देशभर यदुनाथांचे चाहते किती आहेत. त्यांचे पत्ते दिल्यास पत्र पाठवतो' असे कळविताच त्यांनी ४५०० पत्ते आणून दिले. त्या सर्वांना मी एकदा व एकच पत्र पाठवले. त्यातून १ लाख १९ हजार रु. च्या देणग्या कथामालेकडे आल्या. पुन्हा आठवणी नाही. स्मरणपत्र नाही, त्यासाठी समारंभ पुढे ढकलणे नाही. यातच यदुनाथजींबद्दल किती जिव्हाळा, आपुलकी, आदरभाव लोकमानसात होता याचे दर्शन घडते.'' जमलेल्या रकमेतून समारंभाचा खर्च वजा जाता ३५ हजार रु. 'आंतरभारती'साठी, ३५ हजार रु. 'कथामाले'साठी व २५ हजार रु. जान्हवीताईंच्या हवाली करण्यात आले. याच षष्ट्यब्दीपूर्तीनिमित्त श्री. पु. ल. देशपांडे यांनी यदुनाथजींना एक हृदयस्पर्शी पत्र लिहिले होते. ते यदुनाथजींच्या कार्याचे व जीवनाचे यथार्थ मूल्यमापन करणारे ठरते.

१ रूपाली<br>
पुणे-४<br>
५-१०-८२

प्रिय यदुनाथ,

तुमचा टेलिफोन आज फक्त कू-कू हेच ऐकवीत होता म्हणून हे पत्र. तुमच्या आधी साठी ओलांडली असल्यामुळे तुमच्या आजच्या वाढदिवसाच्या प्रसंगी तुम्हाला 'वत्सा, तुजप्रत कल्याण असो' असा आशीर्वाद द्यायला हवा. पण सारे

आयुष्य तुम्ही समाजात सत्प्रवृत्तीची वाढ व्हावी, समाजातील सर्व पातळीवरचे अन्याय दूर व्हावेत यासाठी इतक्या ताकदीने झटता आहात की आशीर्वाद द्यायची योग्यता खऱ्या अर्थाने तुम्हीच प्राप्त करून घेतली आहे असेच म्हणायला हवे. ६०व्या वर्षाच्या टप्प्यावरून मागे वळून पाहाताना कृतार्थता वाटावी असेच जीवन जगल्यासारखे तुम्हाला वाटावे.

साने गुरुजींचे नाव आम्ही सगळेच घेतो, पण ते घेण्याचा फार मोठा अधिकार तुम्हाला आहे. तुम्ही आमच्या आदराचे स्थान आहात हे आज टेलिफोनवरून प्रत्यक्ष सांगताना तुम्ही मला उडवून लावलं असतं म्हणून तुमचं अभिनंदन पत्रातून करायचा योग आला हे चांगलं झालं, असंच मला वाटतं. भोवताली सगळीकडे 'चारू किंवा चरू' हे वातावरण दिसत असताना ज्या निर्लोभी वृत्तीने तुम्ही सार्वजनिक जीवनात स्वत:ला झोकून दिलं आहे त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्याचा हा प्रसंग आहे असे मी मानतो.

एसेम भेटले की एक चालताबोलता आशेचा किरण भेटल्यासारखे वाटते. तेच तुमच्याही बाबतीत म्हणावेसे वाटते.

तुम्हाला याप्रसंगी आशीर्वाद द्यायला एसेम, नानासाहेब, बाबा आमटे, दादा धर्माधिकारी, आपले भाऊ रानडे ही अधिकारी मंडळी आहेत. मी आणि सुनीता 'या पुढील तुमच्या आयुष्यात तुम्हाला जे सुखदायक वाटते ते लाभत राहो' अशी सदिच्छा व्यक्त करतो. तुमचा 'संन्याशाचा संसार' चालवणाऱ्या सौ. जान्हवीताईंना आमचे सप्रेम नमस्कार सांगावे आणि तुम्हाला उत्तम साथ दिल्याबद्दल त्यांना धन्यवादही द्यावेत.

तुमचा
पु. ल. देशपांडे

## कथामाला

'कथामाले'च्या विकासात यदुनाथांचा फार मोलाचा वाटा होता. मुलांना गाणी आणि गोष्टी सांगण्यात ते मनापासून रमत. खरे तर कथामालेत वैज्ञानिकांच्या कथांना प्राधान्य यदुनाथजींमुळे मिळाले. अद्‌भुताची निवड तर ते अगदी क्वचित करीत. हिंदीतल्या प्रेमचंदांच्या मात्र अनेक कथा ते मुलांना सांगत. मराठीप्रमाणे हिंदीसहित अनेक प्रांतांमध्येही कथामालेची चळवळ पसरावी असे त्यांना प्रकर्षाने वाटे. विशेषत: हिंदी भाषिक प्रदेशात पूर्वी कथावाचकांची एक दीर्घ परंपरा होती.

ते मुख्यत: राम-कथा महिनोन्‌महिने अतिशय रसाळपणे सांगत. खेड्यातल्या जनतेवर त्यांचा फार प्रभाव असे. याच पद्धतीने कथामाला देशभर पसरवता येईल का, याविषयी यदुनाथजी सतत विचार करीत. ते स्वत: कथामालेचे अध्यक्ष होते तेव्हा वेगवेगळ्या प्रांतांमधे वेगवेगळ्या भाषांमधल्या कथा आवर्जून सांगत. त्यांना स्वत:ला ३-४ भाषांमधे कथा सांगता येत. संस्थेच्या नियम व अटींमध्ये कथामाला, आंतरभारती यांनी फार गुंतू नये असे त्यांचे मत होते. अशा संस्थांची पुढे संस्थाने होतात. त्यांची कलेवरं शिल्लक राहतात पण प्राण हरवतो. कथामाला सतत प्रवाहित राहावी, 'तिचा खरा आत्मा तिच्या सतत प्रवाहित राहण्यातच आहे.' असे ते आग्रहाने प्रतिपादित. ते जवळ जवळ २० ते २५ वर्षे 'कथामाले'चे अध्यक्ष होते आणि या काळात महाराष्ट्रातल्या खेड्यापाड्यांतल्या शाळांपर्यंत 'कथामाला' पोहचवण्याचे काम त्यांनी केले.

'कथामाले'ने या दृष्टीने महाराष्ट्रातल्या वेगवेगळ्या भागांमध्ये 'भाव-जागरण दिंडी'चे आयोजन केले. अशा सर्व दिंड्यांमधे यदुनाथजींची उपस्थिती अगदी न चुकता, एखाद्या वारकऱ्यासारखी असायची. त्या वेळी त्यांची भावमग्नताही पाहण्यासारखी असे. त्यांच्या परिव्राजक वृत्तीला त्या वेळी उधाण येई. ते अनेक शाळांमधून जात, विद्यार्थ्यांच्या अनेक गटांना आवर्जून भेटत; गाणी म्हणत, गोष्टी सांगत. त्यांच्यात पूर्णपणे रमून जात. 'करी मनोरंजन जो मुलांचे, जडेल नाते प्रभुशी तयाचे' या ओळींचा प्रत्यय त्यांच्या त्या रमण्यातून येत असे. 'आंतरभारती'च्या बालआनंद मेळाव्यातही ते असेच रमून जात.

शाळांच्या शिक्षकांमध्ये पाठ्यपुस्तकातील प्रतिज्ञेविषयी व पालकांच्या मनात बालकांविषयी एक सुजाण जाणीव निर्माण करण्याचे काम 'कथामाले'च्या अनेक उपक्रमातून यदुनाथजींनी केले. शाळांमधल्या आपल्या भाषणांमधे ते शिक्षकांसाठी अनेक पुस्तकांचे संदर्भ मुद्दाम देत. विशेषत: गांधी, विनोबा, जयप्रकाश, लोहिया व साने गुरुजींच्या जीवन आणि साहित्यातील कितीतरी प्रसंग ते उत्कटपणे सांगत.

'कथामाले'च्या वार्षिक संमेलनातही ते एक विचार आवर्जून मांडत; तो म्हणजे मोठ्यांच्या साहित्य संमेलनांनी बालसाहित्यकार व बालसाहित्य यांच्याकडे अधिक लक्ष दिले पाहिजे याचा. मोठ्या साहित्य संमेलनांमधून लहान मुलांना एरव्हीसुद्धा प्रवेश नसे. बालकांची ही उपेक्षा यदुनाथांना अजिबात सहन व्हायची नाही. रत्नागिरीतील साहित्य संमेलनात ते अध्यक्षपदाचे उमेदवार होते पण बालसाहित्यकार व लहान मुले यांना सन्मानजनक स्थान देण्याचे ठरल्यानंतर त्यांनी

आपली उमेदवारी मागे घेतली होती. यदुनाथजींच्या सततच्या प्रयत्नांमुळे पुढे सातारा आणि साताऱ्यानंतरच्या साहित्य संमेलनांमधून बालमेळाव्यांना आणि बालसाहित्यकारांना सन्मानाचे स्थान मिळू लागले. प्रकाशभाई मोहाडीकर आणि यदुनाथ ही 'कथामाले'च्या विकासासाठी निरंतर झटणारी अभिन्न जोडगोळी होती.

## अखेरचे पर्व

मुख्यमंत्र्यांच्या दालनात मराठी उच्चाधिकार समितीची बैठक होती. बैठक संपेपर्यंत यदुनाथांना कुठलाही त्रास जाणवला नाही. परतताना कर्जतला त्यांना पॅरॅलिसिसचा ॲटॅक आला. ते पुस्तक वाचत बसले होते. ते अचानक त्यांच्या हातातून खाली पडले. समोर बसलेल्या श्री. रामदास निवळ यांनी ते उचलून त्यांच्या हातात दिले पण पुन्हा तेच घडले. श्री. निवळ यांनी नंतर खूप मदत केली. जवळपासच्या दोन-चार डब्यात हिंडून त्यांनी एक डॉक्टर शोधून आणला. त्याने तपासून अर्धांगवायूचा झटका आल्याचे निदान केले.

यदुनाथांना शुद्ध होती पण बोलता येत नव्हते. श्री. निवळ यांनी यदुनाथांचा फोन नंबर मिळवला. स्टेशनवरून त्यांनी घरी सौ. माईंना फोन केला. स्टेशनवर त्या वेळी वीज गेली होती. श्री. निवळ यांनी स्वत: यदुनाथ बसलेली ट्रॉली ढकलून त्यांना प्लॅटफॉर्म क्रमांक एकवर आणले. तोपर्यंत जान्हवीताई, त्यांच्या भगिनी, तिची मुलं स्टेशनवर पोहचली होती.

विशेष उपचारासाठी त्यांना नंतर रुबी हॉस्पिटलमधे दाखल करण्यात आले. महाराष्ट्रातून आणि सर्व देशांतून त्यांच्या चाहत्यांची प्रकृतीविषयी सतत विचारणा होत होती. हॉस्पिटलमध्ये भेटायला, बसायला येणाऱ्यांचा निरंतर ओघ असे. त्या सर्वांना आवरता आवरता सौ. जान्हवीमाईंची दमछाक व्हायची. लहान-मोठ्या संघटना व वेगवेगळ्या व्यक्तींनी जमेल तेवढी व जमेल तशी मदत केली. समाजातल्या सर्व थरांत यदुनाथांविषयी किती प्रेम होते याचे प्रत्यक्ष प्रत्यंतर त्या वेळी येत होते.

हृदयविकाराच्या झटक्यातून यदुनाथ पूर्णपणे कधीच सावरले नाहीत. त्या काळात त्यांना अनेकदा भेटलो. एकदा पत्रांचा एक छोटासा गठ्ठा हातात देत ते मंद स्वरात म्हणाले, 'तेवढी पत्रे लिहून टाक.' नावे, पत्ते वाचून मजकूर लिहिता येईल असे वाटून तो गठ्ठा हातात घेतला. पाहिलं तर प्रत्येक कार्डावर यदुनाथांची त्यांचाच पत्ता लिहिला होता!! सर्व पत्रे खिशात ठेवून दिली. इकडच्या तिकडच्या गप्पा केल्या व परत फिरलो.

मृत्यूच्या अवघ्या आठवडाभर आधी त्यांना भेटायला गेलो होतो, माझे मित्र डॉ. पितांबर सरोदेंसहित. ते एकही शब्द बोलू शकण्याच्या स्थितीत नव्हते. आम्ही निघताना त्यांनी माझा हात हातात घेतला. डोळ्यांनी ते जे बोलले ते मनावर कायमचे कोरले गेले.

जवळपास दोन वर्षे त्यांचा मृत्यूशी संघर्ष चालला होता. एका अदम्य आकांक्षेमुळे ते प्रकृती बरी नसतानाही सोलापूरच्या 'कथामाला संमेलना'साठी आणि आनंदवनात बाबांच्या भेटीसाठी जाऊन आले. या वर्षा-दोन वर्षांतही ते स्वत:च्या आजाराविषयी किंवा प्रकृतीविषयी बोलत नसत. जमलं तर भेटायला आलेल्या सेवादल मित्रांसोबत गाण्याच्या सुरात मंद सूर मिळवत किंवा मग थोडेसे बोलत.

स्मृती आणि विस्मृतीच्या हिंदोळ्यावर हेलकावत तो काळ गेला आणि १० मे १९९८ रोजी सर्वांना 'पणती जपून ठेवा'चा संदेश देत तेजाळणारी मशाल निमाली. त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांचा देह साने गुरुजी रुग्णालयाला दान करण्यात आला. ते स्वत: त्या संस्थेचे अध्यक्ष होते.

## देहदान का केले?

मृत्यूनंतर आपले शरीर वैद्यकीय महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना अभ्यासासाठी अर्पण करण्याच्या यदुनाथजींच्या निश्चयामागेसुद्धा एक कथा आहे. त्यांचे शिक्षक आणि प्रेरणास्थान श्री. आपटे गुरुजी यांनी शरीरशास्त्राचा अभ्यास करण्यासाठी पुण्याच्या आयुर्वेद महाविद्यालयाला आपला देह सोपवला होता. ते १९ डिसेंबर १९५६ रोजी वारले. कालांतराने यदुनाथांनी त्यांच्यावर 'आपटे गुरुजी : एक हाडाचे शिक्षक' शीर्षकाचा एक लेख लिहिला व त्यात १९ डिसेंबर हा दिवस 'देहदान दिवस' म्हणून पाळावा अशी सूचनाही केली. देहदानाची आपटे गुरुजींनी लावलेली बी यदुनाथजींमध्ये पूर्णत्वाला पोहचली. मुख्य म्हणजे देहदानासंबंधीची आपटे गुरुजींची जी हकिगत त्यांनी त्यांच्या लेखात नोंदवली आहे, नेमकी ती व तशीच त्यांच्या स्वत:च्या बाबतीतही घडली. आपल्या मरणाच्या स्वागताची तयारी आपटे गुरुजींप्रमाणेच यदुनाथांनी खूप आधीपासून करून ठेवली होती. 'देहदान हेसुद्धा एक समाजशिक्षणच आहे' हा त्यांचा विचार ठाम होता. अध्यापन हा आपटे गुरुजींचा स्वधर्म होता व त्याचे आचरण त्यांनी आपल्या देहाचेही दान करून निष्ठेने पाळला. समाजशिक्षण हा यदुनाथजींचा स्वधर्म होता व त्यासाठी मरणोत्तर आपल्या देहाचे दान करून त्यांनी त्याचे सर्वोत्तम पालन केले.

## जान्हवीमाई

यदुनाथजींच्या या विलक्षण कर्ममय जीवनात अत्यंत मूकपणे फार महत्त्वाची भूमिका बजावणाऱ्या आदरणीय माईंचा–जान्हवीमाई–उल्लेख केल्याशिवाय यदुनाथांचे चरित्र पूर्ण होत नाही. यदुनाथांचे घर म्हणजे अखंड पाणवठा. या पाणवठ्यावर कोण, कुठून, कधी येईल याचा नेम नसायचा. सर्व देशांतून आलेल्या आल्या-गेल्यांचे अगदी मनापासून आगत-स्वागत माई करायच्या. कुठल्याही सभा-समारंभात मी त्यांना कधीही मिरवताना पाहिले नाही. अगदी यदुनाथांच्या साठीच्या सत्कार समारंभातही त्या शांतपणे स्टेजवर बसून होत्या. पण मुंबई आणि पुणे दोन्ही ठिकाणी एकही शब्द बोलल्या नाहीत.

अतिशय मूकपणे यदुनाथजींना सर्व प्रसंगात साथ देणाऱ्या माईंनी मात्र यदुनाथांच्या कर्तृत्वामुळे त्यांना स्वतःला मिळणारे मोठेपण व सन्मान सहजपणे नाकारले होते.

घरी केव्हाही गेलो तरी त्यांच्याशी फार मनमोकळ्या गप्पा व्हायच्या. आपली मते त्या ठामपणे व्यक्तही करायच्या पण सार्वजनिक आयुष्य हे त्यांनी जणू ठरवूनच वर्ज्य केले होते.

यदुनाथांच्या लेखी सगळा देश म्हणजे एक घर होते; तर माईंच्या लेखी घरातच देश होता. त्या उत्तम समाजसेविका होत्या. सेवादलाच्या शाखांवर फार निपुणतेने कार्य करणाऱ्या नेत्या होत्या. त्यांनी स्वतः होऊन बाहेरच्या जगातले सर्व व्यवहार गौण लेखून यदुनाथांची प्रत्येक क्षणी, प्रत्येक वेळी साथ करणे पत्करले व कधीही चूक न करता ते कार्य पारही पाडले.

कवी श्री. वसंत बापट यांनी फारच मार्मिक शब्दांत यदुनाथ-जान्हवी यांचा संसार टिपला आहे, ''त्यांच्या (यदुनाथ) जीवितयात्रेच्या प्रत्येक पुढच्या टप्प्यासाठी शिदोरी बांधून देण्यातच आपल्या आयुष्याचे सार्थक आहे असे लवमात्र वैताग न करता मानणारी जान्हवी म्हणजे यदुनाथची मूर्तिमंत संचित पुण्याईच होती.

''ते माझ्यासारख्या त्या दोघांच्या स्नेह्यांनी अचंब्याने पाहिलेले आहे. व्यक्तिस्वातंत्र्याच्या प्रदर्शनात आणि अतिरेकी अट्टाहासात धन्यता मानणाऱ्या आजच्या युगात यदुनाथ-जान्हवी यांचे जीवनचित्र कुणाला विसंगत वाटण्याची शक्यता आहे, पण आम्ही जे पाहिले आणि अनुभवले त्याला आम्ही 'उदात्त' एवढेच नाव देऊ शकतो. यदुनाथच्या सर्व शक्तींना ग्रहण लागत चालल्यानंतर, त्याचा शक्तिपात झपाट्याने होऊ लागल्यानंतर जान्हवीने काळाशी निकराची झुंज

दिली.

''यदुनाथच्या जीवनाच्या अखेरच्या पर्वात पुष्कळ चढ-उतारही झाले. जरा कुठे आशेचा किरण चमकला असे वाटावे एवढ्याच अशुभाचे मळभ दाटावे. मृत्यूने यदुनाथच्या जीवनाशी चालवलेली लगट प्राणान्ताशिवाय थांबणार नाही असा जीवघेणा खेळ चालू असताना यदुनाथ पूर्णपणे अबोल झाला; त्याची संज्ञा अस्ताला जात चालली. तरी त्या स्थितीत जान्हवीने धीर सोडला नाही. तिच्या खेळकरपणाला खळ पडला नाही; हसतमुखाने आल्या-गेल्यांचे स्वागत करण्याचा परिपाठ मोडला नाही. यदुनाथच्या निधनानंतर आप्तमित्रांची त्याला प्रणाम करण्यासाठी रीघ लागली. अनेकांचे डोळे पाणावले. पापणीच्या काठाशी आसवे जमू न देणारी आणि मिटल्या ओठांनी सर्वांना धीर धरण्याचा इशारा देणारी एकच व्यक्ती तेथे होती–जान्हवी.

''शोकप्रदर्शन होऊ देणे हे तिला असंस्कृतपणाचे वाटत होते आणि इतरांनी अभद्रपणे आपला शोक व्यक्त करावा, हे तिला मान्य नव्हते. या भावनेमागे एक सदैव जागती जाणीव होती की मृत्यू आहे तो एका धीरोदात्त पुरुषाचा.''

जवळपास ४० वर्षे मोठ्या जाणीवपूर्वक माईंनी यदुनाथजींच्या संसार-यज्ञाचे ऋत्विज केले. त्या कधी काळी सेवादलाच्या फूल टायमर होत्या. मनात आणले असते तर त्यांनीही सेवेसाठी बाहेरचे क्षेत्र निवडले असते. पण एका साध्या सेवाभावी व त्यागी माणसाची आयुष्याचा जोडीदार म्हणून त्यांनीच निवड केली होती. पुढे त्या साध्या माणसाची एक खूप मोठा व कर्तृत्ववान माणूस म्हणून वाटचाल सुरू झाली आणि जान्हवीताईंनी आपल्या सर्व आवडी-निवडी व आकांक्षा त्या कर्तृत्वसंपन्न व्यक्तीच्या वाटचालीत विसर्जित करून टाकल्या.

हा मूक त्याग यदुनाथांनी आपल्या आयुष्यात केलेल्या त्यागाइतकाच महत्त्वपूर्ण आहे.

यथाकाल मिहिर व मनीषाचं आणि सुहिता व जयंतचे लग्न झाले, नातवंडं झाली पण माईंच्या जीवनचर्येत फारसा बदल झाला नाही. दोन्ही नातवंडांचं मात्र यदुनाथजींना व माईंना अपार कौतुक असे.

*

# माझ्या स्वप्नांचा सहोदर

जागता जागता
थकली दिवली
सावली तेवली! (विद्युल्लेखा अकलूजकर यांच्या कवितेतील भाग)

यदुनाथ
कोमात गेलेत. मरताना शुद्धीवर नव्हते.
समोर दिशा नाही
कोणीही खुणावत नाही
संथ पावले टाकीत
मित्रांचा तांडा
माझ्या स्वप्नांच्या सहोदराचे शरीर
महाराष्ट्र आरोग्य मंडळाच्या दवाखान्याकडे
पोस्ट मॉर्टेमच्या टेबलावर ठेवून...
रक्ताळलेल्या मनानं अशी
आरपार कापणारी शवयात्रा संपली...

सहोदरा,
माझ्या स्मृतींची सांज सरताना
मी प्रत्येक रात्री
अश्रुडोहांच्या तळाशी निवारा घेतो

मिटलेल्या चोचीचे एक पाखरू
Since thou art Being and Breathe
And what thou art
May not be destroyed

गाढ आणि निःसीम प्रेम
जणू काही आमची मने
एकाच मुशीतून घडलेली होती
दोघांच्या विचारांचा उगम एकच होता
दुही माजवणारे तंटे कधी उद्‌भवलेच नाहीत.
जिथे जिव्हाळ्याचे द्वंद्व-बंधन निर्माण झालेले असते
तिथे अविश्वास व गैरसमजुतींना मज्जाव असतो.

त्यांच्या संगतीत–मोकळ्या व सततोत्साही,
बुद्धिमान मनाच्या सहवासाचा अनुभव येत होता.



विस्मृतींचे थरच्या थर
मानवी मनात साचत असतात
अतृप्त आणि पिपासू आत्म्यांना
एक वरदान आहे.
–त्यांच्या पावलांना खुणा नाहीत!



डोळ्यांना सतत आल्हाद देणारं
केवळ मार्दव त्याच्या सहवासात नव्हतं
पण क्षणिक दरारा दाखविणाऱ्या
काही समाजवादी नेत्यांचा लहरी आविष्कारही तिथं नव्हता.
तिथे होती – फक्त समाजातील निरनिराळ्या प्रवृत्तींच्या
चांगुलपणाच्या पोषणाच्या योजनांबद्दल कनवाळू जिज्ञासा.

गोठलेले जीवन करुणेने पाझरू लागते
सहानुभूतीच्या अंजिरी रंगांनी एकमेकांना धीर देत

व सद्विचारांना, भावनांना गोंजारत तरुणांचे गट
निश्चयाचे नवे बळ सोबतीला घेऊन त्यांचा निरोप घेत
कालाचा पराभव करणारा चिरतरुण कर्मयोगी
आपल्या या मूर्तिमंत समाजातून मूर्च्छितावस्थेतच
निरोप न घेता निघून गेला.
तरुणाईची आपुलकीने चौकशी करणारी
या देशातील ठसठशीत भाग्यरेखा
क्रूर काळाने पुसून टाकली.

ते परीटघडी लेखक नव्हते व
त्यांचे लेखन परीटघडी वाचकांसाठी नव्हते.
सुसंस्कृत वर्गाच्या व जनतेच्या पाठिंब्यावर
उभ्या राहिलेल्या व जनमनाला वळण लावू शकणाऱ्या
पुढाऱ्यांचा व त्यांचा संबंध घनिष्ठ होता; जवळीक होती.
व्यावहारिक डावपेच खेळणारे समाजात यशस्वी ठरतात.
ताडताड राजकीय शिड्या चढून वर जातात.
ध्येयाशी प्रतारणा न करणारा
साने गुरुजींचा एक धडपडणारा चिरतरुण पडद्याआड झाला.
साने गुरुजींची सुधारून काढलेली संक्षिप्त आवृत्ती
संपली ही सर्वांची खंत आहे.
स्वत:च्याच हाकांनी झपाटलेलं
व्यक्तित्व म्हणजे यदुनाथ...
स्वत:च्या अहंतेला स्वत:च नख लावणारा
नम्र सामाजिक कार्यकर्ता, थोर समाजमित्र म्हणजे यदुनाथ.



भणभणणाऱ्या वाऱ्यात, वादळाच्या थैमानात अखंड असलेलं,
मुसळधार पावसात निथळणारं
आणि वसंताच्या कोवळ्या उन्हात
आपलेच पंख मुडपून बसलेल्या
पाखरासारखं व्यक्तित्व यदुनाथला लाभलं होतं.

वाऱ्या-वादळात, पावसात स्तूपासारखा उभा राहणारा
एक सुहृद-मित्र असावा
माझ्या जीवनातून निघून गेला.
'मित्र असावा ढालीसमान
जो सुखकाळी पाठीवरती
संकटकाळी हो पुढती...'
अशीच ढाल घायाळ होऊन पडली.
ठिकठिकाणी देशातली तरुणाई आज
दरदरून हुंदके देत आहे त्याच्या चिरप्रयाणाने
आंतरभारतीच्या कार्यक्रमांचा
प्रियकर एकाएकी निघून गेला.
ज्या मंडळाचा तो अध्यक्ष होता तोच तेथे
आता देहदान देऊन, शवविच्छेदन करून घेत
विरून चालला अज्ञातात–देहाने, मनाने, सर्वस्वाने
साने गुरुजींच्या नेणिवेतील
सर्व तरंगांचा केंद्रवर्ती चिमुकला पक्षी म्हणजे यदुनाथ.
एकुलता जपत चालला होता आपल्या मुठीत
साने गुरुजींच्या काळजातले स्वप्न
तुम्हा आम्हाला जपायचा आहे
त्याच्या काळजावरील डाग
कोण पूर्ण करील त्याचे आंतरभारतीचे
दिव्य-भव्य स्वप्न?
शरीराने पंगु झालेल्या यदुनाथला
जान्हवीने आईच्या मायेनं संभाळलं
एकाकीपणाचं ओझं ती उचलू शकेल समर्थपणे
याची मला खात्री आहे.
सेवेच्या व समर्पणाच्या धुंदीत रमलेल्या मनाला
वैयक्तिक हानीपेक्षा कारुण्य फार जाणवतं.
चिरविरहाच्या दुःखाचा सल
अन् डोळ्यांत जल

हे जान्हवीचं आजचं जीवन
सुख-दु:खं हातात हात घालून
मानवी जीवनात प्रवेश करीत असतात
एका हाताने सुख भोगले तर
दुसऱ्या हाताने दु:खाचे झाड द्यावे लागते

मनस्वी मनाच्या यातना
शोषून घेणारा हा काळ असेल
तरी जान्हवी थांबणार नाही
थांबणे म्हणजे संपणे हे तिला गवसले आहे
पुढची चढण अवघड आहे
त्याला न जुमानता ती शिखर गाठणार

मित्रा,
व्यथागर्भ ठसे जीवनावर उमटलेत
तुझ्या जाण्याने
डोळ्यांतल्या पाण्याआड.
माझे मूक, अनाहूत आक्रोश
मी जपून ठेवण्याचा प्रयत्न केला
पण तुझ्यासाठी

''असे अश्रूही नकोत
जे डोळ्यांचा पाणउतारा करतील.'' (दिलीप चित्रे यांच्या कवितेचा अंश)

## आभार

श्रीमती जान्हवीताई
श्री. वा. रा. सोनार व 'यति यदुनाथ' हा ग्रंथ.
श्री. मधू नाशिककर
व 'साधना' कार्यालय

✳

# महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाची प्रकाशने

| | | | |
|---|---|---|---|
| १) | महाराष्ट्राचा इतिहास प्रागैतिहासिक महाराष्ट्र (खंड पहिला भाग-१) | शां. भा. देव | रु. १२७/- |
| २) | महाराष्ट्राचा इतिहास (मध्ययुगीन कालखंड भाग-१) | संपादक गो. त्र्यं. कुलकर्णी | रु. १४५/- |
| ३) | मध्ययुगीन महाराष्ट्र (सामाजिक आणि सांस्कृतिक जीवन) | प्रा. म. श्री. माटे | रु. ७५/- |
| ४) | समाजशास्त्रीय विचारातील प्रमुख प्रवाह (भाग पहिला) | अनुवादक हेमकांत बळकुंदी | रु. २९५/- |
| ५) | प्रासाद मंडन | डॉ. र. पु. कुलकर्णी | रु. ११४/- |
| ६) | शिल्पप्रकाश | डॉ. र. पु. कुलकर्णी | रु. १६७/- |
| ७) | एक होता गंधर्व | डॉ. राम म्हैसाळकर | रु. ९३/- |
| ८) | गजाआडच्या कविता | श्री. उत्तम कांबळे | रु. ३०/- |
| ९) | प. जवाहरलाल नेहरू व्यक्ती आणि कार्य | संपादक बा. ह. कल्याणकर | रु. १४०/- |
| १०) | भारताचा स्वातंत्र्यलढा | डॉ. वा. ना. कुबेर | रु. १०९/- |
| ११) | मराठी वाङ्मयकोश खंड-४ | समन्वय संपादक डॉ. विजया राजाध्यक्ष | रु. ३२०/- |
| १२) | दादासाहेब गायकवाड काल आणि कर्तृत्व | संपादक मंडळ | रु. ६०/- |
| १३) | भारतातील आदिवासी वंश | प्रा. वि. श्री. कुलकर्णी | रु. १२५/- |
| १४) | खानदेशातील कृषक जीवन | डॉ. रमेश सूर्यवंशी | रु. ६०/- |
| १५) | चरियापिटक | डॉ. शेषराव मेश्राम | रु. ३३/- |
| १६) | चिरकालीन सिरॅमिक्स | डॉ. प्रकाश दळवी | रु. ४५/- |
| १७) | छत्रपती शिवाजी महाराज | श्री. प्र. न. देशपांडे | रु. ४८/- |

| | | |
|---|---|---|
| १८) सर्वज्ञ चक्रधर | प्रा. पुरुषोत्तम नागपुरे | रु. ३७/- |
| १९) संत जनाबाई | डॉ. सुहासिनी इर्लेकर | रु. ५०/- |
| २०) मराठ्यांची प्रशासन व्यवस्था | सौ. विजया कुलकर्णी | रु. १४५/- |
| २१) लैंगिक नीती आणि समाज | श्रीमती शकुंतला क्षीरसागर | रु. १४५/- |
| २२) मराठी वाङ्मयकोश खंड २, भाग - १ | डॉ. गो. म. कुलकर्णी | रु. १३०/- |

*मंडळाची प्रकाशने मिळण्याची ठिकाणे*

सर्व शासकीय ग्रंथ भांडार
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद व
महाराष्ट्रातील प्रमुख ग्रंथविक्रेते

*अधिक माहिती/चौकशीसाठी*

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
तिसरा मजला, दादर (पूर्व),
मुंबई-४०० ०१४
दूरध्वनी - २४१४४०२१, २४१४६००५

## महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई
### महाराष्ट्राचे शिल्पकार योजनअंतर्गत चरित्रग्रंथ
### मालिकेतील चरित्रग्रंथ

| | | | |
|---|---|---|---|
| १) एस. एम. जोशी | श्री. ग. प्र. प्रधान | रु. | ४०/- |
| २) साने गुरुजी | श्री. राजा मंगळवेढेकर | रु. | ४०/- |
| ३) दादा धर्माधिकारी | श्रीमती तारा धर्माधिकारी | रु. | ४०/- |
| ४) क्रांतिसिंह नाना पाटील | श्री. भारत पाटणकर | रु. | ४०/- |
| ५) डॉ. विठ्ठलराव विखेपाटील | श्री. शिवाजी सावंत | रु. | ३५/- |
| ६) शंकरराव किर्लोस्कर | श्रीमती शांता किर्लोस्कर | रु. | ४०/- |
| ७) मामासाहेब जगदाळे | श्री. व. न. इंगळे | रु. | ४५/- |
| ८) तंट्या भिल्ल | श्री. बाबा भांड | रु. | ४५/- |
| ९) यशवंतराव चव्हाण | श्री. विठ्ठलराव पाटील | रु. | ४०/- |
| १०) दादासाहेब फाळके | श्री. बापू वाटवे | रु. | ३५/- |
| ११) ताराबाई शिंदे | श्री. इंद्रजित भालेराव | रु. | २५/- |
| १२) तेजस्विनी अहिल्याबाई होळकर | सौ. विजया जहागीरदार | रु. | ४५/- |
| १३) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | डॉ. अरुंधती खंडकर | रु. | ४०/- |
| १४) स्वातंत्र्यवीर सावरकर | श्री. सुधाकर देशपांडे | रु. | ४०/- |
| १५) बॅ. राजाभाऊ खोब्रागडे | श्री. व्ही. डी. मेश्राम | रु. | ३५/- |
| १६) स्वामी रामानंद तीर्थ | श्री. प्रकाश मेदककर | रु. | ४५/- |
| १७) पठ्ठे बापूराव | श्री. चंद्रकुमार नलगे | रु. | ४५/- |
| १८) भाई उद्धवराव पाटील | श्री. व. न. इंगळे | रु. | ५५/- |
| १९) धोंडो केशव कर्वे | डॉ. न. म. जोशी | रु. | ४०/- |
| २०) लोकहितवादी | डॉ. निर्मलकुमार फडकुले | रु. | ४०/- |

*मंडळाची प्रकाशने मिळण्याची ठिकाणे*

सर्व शासकीय ग्रंथ भांडार
मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद व
महाराष्ट्रातील प्रमुख ग्रंथविक्रेते

*अधिक माहिती/चौकशीसाठी*

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
तिसरा मजला, दादर (पूर्व),
मुंबई-४०० ०१४
दूरध्वनी - २४१४४०२१, २४१४६००५



**डॉ. मु. ब. शहा**

महाराष्ट्राच्या समाजपरिवर्तनाच्या चळवळीत अत्यंत अभ्यासू, विचारवंत व निष्ठावंत वक्ता म्हणून डॉ. मु. ब. शहा ओळखले जातात. 'छात्रभारती'चे संस्थापक-अध्यक्ष म्हणून काम केलेल्या डॉ. शहांनी 'छात्रभारती'च्या माध्यमातून समाजप्रबोधनाची अनेक शिबिरे महाराष्ट्रभर घेतली. 'आंतरभारती'च्या माध्यमातून त्यांनी राष्ट्रीय एकात्मता, हिंदू-मुस्लीम एकता इत्यादी विषयांवर व्याख्याने दिली. 'महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभे'चे प्रचारक म्हणून सुमारे ५० वर्ष ते काम करत आहेत. महाविद्यालयीन सेवेच्या काळात त्यांनी 'राष्ट्रीय सेवा योजने'चे चार वर्ष नेतृत्व केले. विविध व्याखानमालांतून व्याख्याने देणारी डॉ. मु. ब. शहा 'नर्मदा बचाव आंदोलना'तही सक्रिय आहेत.

डॉ. रा. चिं. ढेरे यांचे 'लज्जागौरी', डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांचे 'हिंदू समाज संघटना आणि विघटन', रजिया पटेल यांचे 'चाहूल' ही आणि इतर पुस्तके त्यांनी हिंदीत अनुवादित केली आहेत. तसेच अमृता प्रीतम यांचे 'रसीदी टिकट' हे आत्मवृत्त, डॉ. राममनोहर लोहिया यांच्या व्यक्तिमत्त्वाचा परिचय करून देणारे 'अधुरी कहानी' इत्यादी अनेक हिंदी ग्रंथ त्यांनी मराठीत भाषांतरित केले आहेत.

'मी आणि बालकवी', 'सत्त्वगुणी', 'गांधी-विनोबांची पत्रे', 'इतिहासाचार्य वि. का. राजवाडे समग्र साहित्य' (१३ खंड) इत्यादी ग्रंथांचे संपादनही डॉ. शहांनी केले आहे.

त्यांना २००१ सालचा 'महाराष्ट्र फाउण्डेशन'चा 'समाजकार्य गौरव पुरस्कार' देऊन त्यांच्या या कार्याविषयी कृतज्ञता व्यक्त करण्यात आली. अहिंदी भाषी लेखकांच्या हिंदी लेखनाबद्दल व राष्ट्रभाषेच्या विविध कार्यांबद्दल त्यांना दोनदा राष्ट्रपतींकडून सन्मानित करण्यात आले.